# —: काल :—

[ काव्य संग्रह ]



: लेखक :

शाहीर रेणापूरकर



किंमत २ रुपये

# पूज्य स्वामीजी !—



आपला आसीम त्याग, जनताजागृती विषयीची सतत
तळमळ, हैद्राबादच्या अमानुष व जातीय अशा
जुल्मी सत्तेशीं निर्धारानें टक्कर देत
असतां देखील भारताबद्दलची
अढळ निष्ठा व आपलें कुशल
नेतृत्व या अलौकिक
गुणांवर लुब्ध होऊन
ही माझी अल्प
स्वीकृति आपल्या
चरणीं अर्पण
करीत आहे.

— लेखक



# प्र स्ता व ना.

स्वतः लेखकानेंच आपल्या पुस्तकाला प्रस्तावना लिहावी असें श्री. खांडेकरांसारख्या यशोगिरीच्या शिखराला पोंचलेल्या साहित्यिकाचें मत असतांना, लेखक व साहित्यिक नसलेल्या माझ्यासारख्यानें काव्यसंग्रहाला प्रस्तावना लिहिणें धारिष्टयाचेंच होणार, शिवाय तें लिखाण प्रस्तावनेऐवजीं राजकीय परीक्षणही होण्याचा संभव आहे. कारण श्री. रेणापूरकरांच्या काव्यलेखनकालाचा आरंभ अशाच वेळीं झाला कीं ज्यावेळीं निझामी सत्तेचा जुलूम पराकोटीला पोंचून जनतेच्या असंतोषाला वाचा फुटणें अपरिहार्य झालें होतें. संघ, लेखन, वाचा स्वातंत्र्यासारखे नागरिक हक्क तर दूरच पण साध्या व्यायामशाळा आणि कीर्तनसंस्था यांवरही बंधनें घालण्यांत आलीं होतीं. याच कालांत कवि, लेखक, समाजसेवक आणि सरकारी अन्यायाला बळी पडणारी जनता यांनी राजकीय संस्था स्थापून वर्तमानपत्रद्वारां, मेळयांच्या संवादगाण्यांतून आपआपल्या असंतोषाला वाचा फोडली. श्री. रेणापूरकरांची प्रतिभा देखील याच कालांत जागृत झाली. आणि लातूरच्या राममंदिर मेळ्यांतून ती जनतेपुढें प्रकट झाली. आणि म्हणूनच एरवीं कवींतला मातेचा हळुवारपणा दिसण्याऐवजीं वडिलांचा धाकच श्री. रेणापूरकरांच्या काव्यांत अधिक प्रतीत होतो.

पूर्ण झोंप झाल्यानंतरही तशाच आळसांच पहुडलेल्या माणसाला त्याच्या प्रेमी जीवानें येऊन लाडिकपणें तोंडावरचें पांघरुण काढून जागें करण्याचा प्रयत्न करण्याऐवजीं गाढ झोंपलेल्या माणसाचें पांघरुण खस्कन् ओढून 'चल ऊठ' म्हणावें, असा हुकमी आवाज त्यांच्या काव्यांत निघतो. भैरव रागांतील पहाटेच्या सनईऐवजीं मध्यान्हींतील सारंगाचेच सूर त्यांत अधिक आढळतात. मंगलकार्यांतील मंजुळ वाद्याऐवजीं कर्तव्यकठोर रणदुंदुभीचाच ध्वनि त्यांत स्पष्ट होतो आणि हे किती अपरिहार्य होतें !—

कदाचित् या अपरिहार्यतेमुळेंच श्री. रेणापूरकरांच्या काव्यांत शांती व प्रीतीच्या गूढ व गोड गुंजारवापेक्षां नवसमाज निर्मितीचा आदेश ऐकूं येतो. याला परवांच्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष श्री. आचार्य जावडेकरांनी म्हटल्याप्रमाणें 'क्रांतिरस' म्हणतां येईल. या क्रांतिरसाचीच

प्रचीती त्यांच्या बहुतेक सर्व काव्यलेखनांतून दिसून येते. आपली नवसमाज निर्मितीची तळमळ त्यांनी जुलमी सरकारवर प्रखर टीका करून, समाजापुढें त्याच्या दोषांचा आरसा धरून आणि स्वातंत्र्यानंतर येणाऱ्या भावी पुरोगामी राजवटीचें मनोरम चित्र रेखाटून व्यक्त केली आहे.

समाजांतील दोष दाखवितांना 'पूर्वज आणि आम्ही' या कवितेंत तेव्हांच्या आणि आतांच्या परिस्थितींतील अंतर त्यांनीं "उत्तरला चिमटा, वर रक्ताळलें पुणें जेथें; भावाच्या रक्तानें न्हाणें आज शौर्य येथें' अशा परिणामकारक शब्दांनीं दाखविलें आहे. गरिबांची पिळवणूक करतांना श्रीमंत व सत्ताधारी यांची युति कशी होते हें 'भांडवलशाही' 'शेतकरी' या कविता वाचतांना उमगतें व हे प्रसंग जणूकाय आपल्यासमोर घडत आहेत असें प्रत्ययास येतें. 'हिंदूंच्या चाली' खरेंच मान खालीं घालावयास लावतात. भारताच्या स्वातंत्र्यसंग्रामांत भाग घेणाऱ्या योद्ध्यांकडे केवळ तमासगिराच्या वृत्तीनें पाहणारे, नव्हे प्रसंगीं त्याचा उपहासही करणारे शेकडों लोक आज फक्त पांढऱ्या टोपीचें पुण्य शिरीं ठेऊन, सत्तेच्या शेरणीचे वांटेकरी होण्यासाठीं धडपडतांना पाहून अजूनही कवीच्या शब्दांत त्यांना सांगावें वाटतें कीं, 'तव त्यागाचा थेंब एकला– कृतार्थ हो टाकुनी.' हिंदी समाजाच्या कोडग्या अज्ञानाची जितकी कींव करावी तितकी थोडीच आहे. जातीयता, प्रांतीयता व सामाजिक उच्चनीचता हे सर्व आमच्या प्रगतीच्या मार्गांतील खंदक आहेत. ते खंदक म्हणजे परकी 'नोकरशाहीचें स्वार्थी धोरण' होतें ही नित्याच्या अनुभवाची गोष्ट 'धर्मांतर करतांच कालचा एकजात हिंदू; माणुसकीला होय पारखा कां मुस्लिमबंधू?' या शब्दांत कवीनें सांगितली आहे.

ज्याप्रमाणें 'क्रांतिरस' हें त्यांच्या काव्याचें वैशिष्ट्य आहे, त्याचप्रमाणें शेतकऱ्यांच्या हृदयाला हलविणारा पोवाडा हेंही त्यांच्या वृत्तीचें वैशिष्ट्य आहे.

जनता–स्वातंत्र्याच्या लढ्यांत स्फूर्ती निर्माण करून परिस्थिति-दर्शनाची विविध अंगें सोप्या, जिव्हाळ्याच्या मराठी व हिंदी शब्दांत व्यक्त केलीं आहेत. 'राजकुँवर' या कवितेंत 'स्त्री ही पुरुषाच्या मार्गांतील धोंड आहे'

या स्त्रियांवरील आरोपांचें त्यांनीं खंडन केलें आहे. उलट, ‘ स्त्री ही स्फूर्तिदायक देवता आहे ’ हा सिद्धांत त्यांनीं त्यांत मांडिला आहे. साधारणपणें कविता शाहिरी डौलाची वाटते. भाषेंत सौष्ठवापेक्षां औचित्य अधिक असून ‘ जीवनाकरितांच कला व काव्य ’ असा रेणापूरकरांचा बाणा दिसतो.

‘ जनता संग्राम ’ ही कविता वाचल्यानंतर मागच्या गोष्टी आठवल्यास नवल नाहीं. हैदराबादी जनता जुलमी सत्तेशीं अनेकविध पावित्र्यांनीं लढत असतां भारताच्या स्वातंत्र्यावर वारसा हक्क सांगणारे कांहीं दत्तकपुत्र हैदराबादी जनतेला ‘ बाहेरून ’ लढा चालविल्याबद्दल, ‘बाहेर’ च्या लोकांचें सहाय्य घेतल्याबद्दल नांवें ठेवीत असतात. हिटलरशीं लढणाऱ्या इंग्रजाला कधीही न जुळणाऱ्या स्टॅलीनचें सहाय्य घ्यावें लागलें. स्वतः भारताला स्वतंत्र होतांना जागतिक परिस्थितीचें किती सहाय्य झालें, हें विसरतां येणार नाहीं. अशा स्थितींत भारताचा अविभाज्य घटक असणाऱ्या हैदराबादेंतील जनतेनें भारतीयांचें सहाय्य घेतल्यास यांत नांवें ठेवण्यासारखें कांहीं नसून परस्परांना भूषणावह अशीच ही गोष्ट आहे. आणि हेंच कवीनीं आपल्या ‘जनता संग्रामां’ त यथोचित शब्दांत सांगितलें आहे. काव्याच्या प्रास्तविकांत कवीनें “जनता-संग्रामांत” खर्ची पडलेल्या हुतात्म्यांविषयींचा उल्लेख केला आहे. खर्चाची मोजदाद होईल हें खरें पण ‘ वर्तक’ ‘ बहिर्जी’ सारख्या देशाच्या गंगाजळींतूनच गेलेल्या मोहरांची तूट कशानेंही भरून निघणार नाही हेंही तितकेंच खरें.

नवसमाज निर्मितीचें त्यांचें स्वप्न स्वातंत्र्यरूपानें अल्पांशानेंतरी सत्यसृष्टींत उतरलें आहे. अजून आपल्याला मातेच्या मायेन जगाला जेऊं घालणारा शेतकरी सुखी करायचा आहे. या साठीं आपल्याच हट्टी बांधवांशीं लढा द्यायचा आहे. पूर्वी मोकळे असलेले सर्वच मार्ग आतां बंद आहेत. त्यासाठीं परिणामकारक प्रचाराचीच आवश्यकता आहे. अर्धेंच राहिलेले स्वप्न पूर्ण करावयाचें तर आज सशस्त्र योद्ध्यापेक्षां अगर शांतिपूर्ण सत्याग्रहीपेक्षां जनतेंत नागरिकत्वाच्या जबाबदारीची व सामुदायिक नीतीची जाणीव उत्पन्न करून सामाजिक व आर्थिक समतेचा पुरस्कार करणाऱ्या वाङ्मयाचीच अधिक अवश्यकता आहे.

शेवटीं मराठवाड्यांतील एकनाथ, दासोपंत, रामदासांसारख्या ज्या संतकवींनीं आपल्या काव्यवाङ्मयानें मानवतेची सेवा तर केलीच आणि त्याचबरोबर मराठवाड्याचा लौकिकही वाढवला त्या संतकवींच्या थोर परंपरेला साजेशी वाङ्मयनिर्मिती श्री. रेणापूरकरांच्या लेखणींतून व्हावी, त्याचप्रमाणें संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेसाठीं व त्याच्या विकासासाठीं मराठवाड्यास आपला जबाबदारीचा हिस्सा योग्य रितीनें उचलतां यावा म्हणून त्यांची लेखणी येथील जनतेंत स्फूर्तिदायी होवो एवढी अपेक्षा करून ही प्रस्तावना संपवितो.

रा. गो. परांजपे



# नि वे द न.

स्वतःला ओळखणं फार कठीण आहे. मोठी माणसं देखील आयुष्यभर कर्मफलाची आशा न धरितां सतत काम करीत राहतात आणि त्यानां देखील जनताच ओळखते. ‘ आपण काय करीत आहों ? ’ ते बरं आहे कीं वाईट ? ’ ‘ लोक काय म्हणतात ? ’ या गोष्टींचा विचार देखील न करतां सारा वेळ फक्त कामाकडेच—आपलं ध्येय गांठण्याकडेच देण्यानं म्हणा किंवा केवळ आत्मविश्वासामुळं म्हणा स्वतःच्या गुणदोषाकडं स्वतः क्वचितच बघतों, आणि तें काम स्वाभाविकच इतरांकडं येतं.

वर दर्शविलेल्या चौकटींत बसण्याची माझी मुळींच योग्यता नाही. त्यापैकीं फक्त गुणदोषाचा भाग परिक्षणाकरितां मी जनतेवरच सोंपवीत आहे. अस्तु.

मला कल्पना आहे कीं जीवनाच्या अनेकविध अंतरंगांतील सौंदर्य जगाला दाखवणारा ‘ कवि ’ मी नाही. प्रस्तुत प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणं जीवनांतील निर्घृण अशा राजकीय कुचंबणेमुळंच मला स्फूर्ती आली. अर्थात् बहुतांशी तेच पडसाद माझ्या लिखाणांत उमटणं अपरिहार्य झालं. आणि

म्हणूनच अशिक्षित बहुजनसमाजाला जागृत करण्याच्या एकाच इच्छेनं प्रेरित झाल्यामुळं भाषेंत सोपेपणा आणण्याच्या प्रयत्नांत कांहीं ठिकाणीं गद्य ओळीं वाटण्याचा संभव आहे.

'पोवाडा' आणि 'छंदोरचना' यांचा मेळ कसा काय बसतो हें पाहणं मला जमलं नाही. स्वतःच शाहीर आणि लेखक असल्यामुळं मला जें वाटलं तें बरोबर कीं चूक हें पाहणं मी वाचकांवरच सोंपवितो.

—आणि हें सारं ओळखूनच कीं काय पूज्य बाबासाहेब यांनीं माझ्या लिखाणाचं साहित्याच्या दृष्टीनं परीक्षण करायचं टाळलं असावं, पण कामाच्या प्रचंड गर्दीतसुध्दां माझ्या वाकळीवर त्यांनीं सुंदर अभ्रा चढविला या बद्दल मी पूज्य बाबासाहेबांचा अत्यंत ऋणी आहे.

तसेंच अॅडव्होकेट दिवाण यांनीं माझ्या अडचणी ओळखून त्या दूर करण्याचा सक्रिय प्रयत्न केला व वेळोवेळीं उपयुक्त असा सल्ला दिला याबद्दल त्यांचे व याच कामाबद्दल श्री. दासराव वकील बी. ए. (ऑनर्स) यांचेही आभार मानतो.

येथील राममंदिरच्या चालकानाही चांगल्या व नवीन कार्यक्रमाची मेळ्याकरितां नेहमींच अवश्यकता असते व मला माझाही कार्यक्रम या शहरापुरतां तरी जनतेपुढं ठेवायचा असतो या दृष्टीनं तें व्यासपीठ व माझं साहित्य यांचा अविरल असा समसमां संयोग झालेला आहे.

पुस्तक प्रकाशनाचं खरं श्रेय श्रीमान् शेठ रामगोपालजी राठी, श्री. रामजीभाई ( कस्तुरचंद रघुनाथ ) श्री. ग्यानोबा ढगे, श्री. मुक्तारामजी जानकर, श्री. शातीनाथ खंडाळकर, श्री. नानासाहेब काशीकर व डाक्टर्स, वकील, कारकून, शिक्षक व इतर व्यापारी आणि रेणापूरचे श्री. लिंगप्पा खुमसे यानांच आहे. यांनी दिलेल्या—हस्ते आणि परहस्ते—आर्थिक मदतीमुळंच माझा संग्रह प्रकाशांत येऊं शकला.

शेवटीं ज्यांनीं पुस्तक छपाईचं काम अत्यंत सुबक करून दिलं त्या लोकमान्य प्रिं. प्रेसचे व्यवस्थापक श्री. कमलाकर पित्रे, श्री. प्रभाकर पित्रे, मास्टर यशवंत व श्री. आंग्रे यांचे आभार मानून हें निवेदन संपवितो.

— लेखक

# जय भारत.

लेखनकाल:— २५ ऑगस्ट १९४६.

[ मी हिंदी स्वातंत्र्याचे कांही महत्वाचे टप्पे कल्पिले आहेत. कोणत्याही देशाचा इतिहास अशा प्रसंगांनींच उज्वल ठरतो. त्या पैकी खुदिराम बोस, भगतसिंग प्रभृतींची अत्याचारी चळवळ, २ महात्माजींची अनत्याचारी चळवळ व 'चले जाव' ठराव, ३ नेताजींच्या आझाद सेनेचा सशस्त्र उठाव, ४ आणि २ सप्टेंबर १९४६ ला आपले हृदयसम्राट् पं. नेहरु भारताचे पहिले लोकनियुक्त पंतप्रधान झाले. हे प्रसंग स्वातंत्र्याच्या पायांतील पहिले दगडच नाहीत कां ? या चार कल्पना खालील गीतांत क्रमशः मांडल्या आहेत. ]

( चाल : भूप-धुमाळी )

जय जय भारत, जय भारत जय
जय भारत, जय हो.
अखंड भारत झाला जागृत
सजला वीर महान्
रक्तदान देउनी बनविली
भारतभू बलवान्, जय हो.

शांत क्रांतिची करी घोषणा
होई देश बेभान्
बजाविलें साम्राज्यशाहिला
‘ छोडो हिंदुस्थान ’ जय हो.
‘ चलो दिल्ली ’ ही केलि गर्जना
गाजवि रण मैदान्
अमर कीर्तिच्या या ‘ चंद्राला ’
हा ‘ जयहिंद ’ प्रणाम्, जय हो
पहा चालला अतां दिल्लिला
भारतियांचा प्राण
तिथे फडकिण्या लाल तटावर
तिरंगि राष्ट्र निशाण, जय हो.

---

# पूर्वज आणि आम्ही.

लेखनकाल:— गणेशचतुर्थी १९३५.

[ इंग्रजी राजवट व शिक्षणपद्धतीमुळें भारताची विशेषतः शारिरीक व मानसिक जी हानी झाली आहे, ती पुढील पाव शतकांत तरी भरून निघणें शक्य नाही. तरी पण प्रचारानें अंग म्हणून मी आपल्या पूर्वजांशीं तुलनात्मक असें खालील काव्य लिहून महाराष्ट्राच्या सुप्तशक्तींनां जागें करण्याचा प्रयत्न केला आहे. ]

( चाल : पोवाडा )

धन्य धन्य तें चरित्र आमुच्या शूर पूर्वजांचें
धिःकार असो आज आम्हाला, हो वंशज त्यांचे
दगडा खांचेतुनी धांवणें सहजगत्या त्यांचे
खडे बोंचती सडकेवरि हें नाजुकपण आमुचें

उभी दरड दगडांची चढुनी विजयी जे झाले
नजर फेंकतां चक्कर येते, गरगरती डोळे
द:खन वारुवरी गांठले उत्तरचें टोक
सेकंड्क्लास् पाहिजे आम्हाला, हा आमुचा झोंक
धन्य ते वीर गाजले
काळ चळचळे
घाबरुनि पळे
स्वर्ग तो तयानां साजे
मिळविलें देवपद मनुजे
नरकाचे आम्ही राजे
आपुल्या पायावरी नादणें हेच ब्रीद ज्यांचे
धि:कार असो •

गोमातेच्या दुधावरी हो पुष्ट शक्ति ज्यांची
चहा, कॉफी, सिगरेट ओढणें ही 'पावर' आमुची
घोंगडिचें ते राज्य दाखवी शक्ती वीरांची
नेकटाय, कॉलर, फॅशन् आमुच्या खप्पड गालाची
दाढि मिशी भरदार, रगले कल्ले गालांचे
ओठांचा अवतार जाणवी श्राद्धाचि पितराचें
राजीव बाळ आइचे
धैर्य शौर्याचे
लोपले साचे
ही जिवंत प्रेतें उरलीं
मृत्युची अवकळा आली
निर्वीर भूमि ही बनली
थरथरले गर्जना ऐकतां मन दिग्पालांचें
धि:कार असो ०

परावलंबी जिणें जयानां वाटे मरणाचें
तेंच आमुच्या मांसीं खिळले जगणें नरकाचें

' स्वावलंब ' हा शब्दचि भरला रोमरोमिं ज्यांच्या
अन्नाचाही घास न उतरे, शिवाय परक्यांच्या
जसें बोलणें तसें वागणें, कधीं न हो दैना
बोल बोलती पोपटपंची, जणुं दुसरी मैना
संपूर्ण स्वावलंबन
तेंच वागणं
तयांचें ध्यान
परक्यांचा घे पोषाक
जरि असला घरचा रंक
पोझिशन् आम्हां ती एक
' स्वावलंब ' हा मार्ग जयांचा, ध्येय आयुष्याचें
धिःकार असो ०

उत्तरला चिमटा, तर रक्ताळले पुणें जेथे
भावाच्या रक्तानें न्हाणें आज शौर्य येथे
स्फुरले, विरले, जगले, मेले ते देशासाठीं
गुलामींत आनंद मानणें हांव आम्हां मोठी
मायभूमिचें रक्षण केले, दंडाचा जोर
कुटुंब आमुचें रक्षण करणें, आम्हां हा घोर
उगवेल कां पुन्हा सूर्य ?
पूर्विचें धैर्य
पूर्विचें शौर्य
होऊं कां आम्हीं ' ते ' आतां
व्हा तयार मरण्याकरितां
ते बरें गुलामी परतां
कसें मरावें हेंच शिकावें आज ध्येय आमुचें
तरीच आम्ही योग्य तयानां हो वंशज त्यांचे

# भांडवलशाही.

लेखनकाल--गणेशचतुर्थी १९३८.

[ श्रमजीवी वर्गाला सतत टाचेखालीं तुडवून व्यक्ति, समाज व देश यांच्याबद्दल पूर्ण बेफिकीर असणाऱ्या भांडवलशाहीचें खालील कवितेंत अल्प वर्णन केलें आहे. निराकरणाचा उपाय म्हणून सामुदायिक संघटना हा एकच मार्ग श्रमजीवी वर्गाला उपलब्ध आहे. समाजांतील विषम परिस्थिती बदलण्याचा हा एकच उपाय आहे. ]

( चाल : साध्या पोवाड्याची. )

ऐका ऐका बंधुनो ! ध्यान असूं द्या कांहीं
वर्णितो आज राक्षसी भांडवलशाही, जी जी
कामगार, शेतकरी, मजूर कुणी नोकर
साऱ्यांचं घेतलं रक्त हिन आजवर, जी जी
या साऱ्या गोरगरिबांच्या जिवावर मौजा
श्रीमंत भोगितो चैन, जसा तो राजा, जी जी
मोठमोठ्या हवेल्या उंच उंच बिल्डिंगा,
मोटार उडवि सहकुटुंब,घालितो पिंगा, जी जी
महालात राघुमैनेचा गुलाबी रंग
विसरतो गरीब जगाला, होउनी दंग, जी जी
या त्यांच्या चैनिपाइ किती अभागी जीव-
खपतात, कुणी मरतात, काय दुर्दैव ? जी जी
पिकवितो धान्य शेतांत
राबतो कारखान्यांत, जी जी
घेउनी पाठिवरि ओझें
कष्टतो उन्हांतान्हात, जी जी
कुणि घाशि सारखे खर्डे
त्या दिवस नाही रात, जी जी

सत्तेला आज दरकार काय हो तुमची ?
ऑफिसांत येता श्रीमंत त्याला हो खुरची, जी जी
त्यांच्यासाठीं खुला दरबार याया जायाला
तो उभा शिपाई तुम्हा धक्के द्यायाला, जी जी
श्रीमंत झेलती थुंकि रोज हो त्यांची
मागतां अर्पिती लाच लाखो रुपयांची, जी जी
पोटास मागण्या संप तुम्ही जरि केला
दडपण्या तुम्हा तय्यार पहा मार्शल्लॉ, जी जी
पोटास मागण्या हक्क तुम्हाला आहे
असं असुन कामगार कां दरिद्री राहे ? जी जी
बंधुनों ! याला उत्तर फक्त एकीचें
नका जगूं तुम्ही हालात, जिणें कुत्र्याचें, जी जी

एकीचें हें सामर्थ्य
हालविते गोल पृथ्वीला, जी जी
जर एकीनें मागाल
जे हवे मिळेल तुम्हाला, जी जी
करा संघ कामगारांचा
लागेल सौख्य देशाला, जी जी

एकीचा हा महामंत्र बाळगा ध्यानीं
बलवान मित्र जिकाल, उरेना कोणी, जी जी
मग आपला देश भारत सुखी होईल
शाहीर आणि हा देश सुयश चिंतील, जी जी

*

# मर्द भला.

लेखनकाल--गणेशचतुर्थी १९३७.

[ मागील 'पूर्वज आणि आम्ही' याच कवितेचा ओघ पण खेडवळ भाषेंत. उपयोग झालाच तर खेड्याकरिता, म्हणून हा प्रयत्न. ]

( रागडी भाषेंत )

हा आर्य सनानत् धरम्, व्येस लइ करम्, दाविलं वरम्,
जगांतील स्यान्या स्यान्याला, लाविलं अडळ निसानाला,
दुनियाभर झेंडा फडकविला, जी जी
राना परताप, ईर इक्रम, सूर रनधीर जी
म्हाराज छत्रपति सिवाजी, सिकंदर सूर जी
जनु काट छातिचा मालुसरा नरवीर जी
जन्मला मर्द भलभला, धरम उजळला, द्येस झुकवीला,
इतर समद्यास्नी धाक पडला, दडपिलं मोठ्यामोट्याला,
डोळा कुनि न्हाई उचलीला, जी जी
रनसूर निपजलं गडी, समद्यावर कडी, घोडं भीमथडी, १
बाव्टा धरमाचा हुबा क्येला, येसिवर टांगलं इतराला,
थरथरा लागलंय कापायला, जी जी
धरमाची लाज राखली परान देऊन जी
द्येस्याची लाज राखली परान देऊन जी
वाडविली कुसी आईची परान देऊन जी
म्हागारा न्हाई परतला, धन्य मर्दाला, धन्य हिमतीला,
आतावानी ईर न्हाई गमला, थाट फॅसन्चा न्हाई केला,
मर्द भला मर्द मर्द झाला जी २

भाकरी कांदा लसून, हातावर घेऊन, रट्टावुनशान,
झाला तय्यार त्येचा भाला, उडाला दोन हात खेळायला,

न्हाई होटल्ची मजा त्याला, जी जी
पोटाची गार भरली हुरडा खाऊन्शान जी
पोटाची गार भरली फुटानं बूकून जी
कदी हाय कोंद न्हाई बी, चाल्ला उडून जी
बगा आता घालत्यात घाट, मेज़्वानीचा थाट, दोस्तीचे सोट,
जमत्याती समदे फराळाला, चामंदी भिस्कुट बुडवायला,
इथं कुठं घालावं धरमाला, जी जी ३
आंग्रजी आलं न्हाई त्येला, न्हाइ बोलला, न्हाई वादला,
ग्येला न्हाई मोट्या सभंला, ऐकिलं न्हाई लेक्चराला,
तोंडानं वाद न्हाई क्येला, जी जी
दरबार त्येचा मैदानी, वाद लई थोर जी
तैय्यार जबाब द्यायाला ढाल तल्वार जी
झटपट निकाल वादाचा, न्हाई हरनार जी
भरदार रूप त्ये भलं, वैऱ्याचं काळ, लई इकराळ,
तुमच्यावानीं बोड्लं न्हाई मिशिला, तुमच्यावानी क्राप न्हाई ठिव्ला,
न्हाई दुसऱ्याचा गुलाम झाला, जी जी ४
टाकली मांड दसऱ्याला, ईर नीगाला, ग्येस जितन्याला,
सोडून्शान् अस्तुरि बाळाला, न्हाई कलिजाची पर्वा ज्याला,
धरम अन् ग्येस ग्येव त्येला, जी जी
जीव हातामंदि घेतला त्याच ईरानं जी
ठाकला रनामदी ढ्बा, सतीचं वान जी
घरावर मारली लात समुदं सोडून जी
अस्तुरी बोलतिया त्येला, जावं लडाइला, घ्यावं येस्याला,
ववाळिन इजई ईराला, बिगडलं येईन सरगाला,
वाकडा भांग न्हव्ता तिजला जी जी ५
सोडून्शान आपला अबिमान, हिंदु त्यो असुन, होतो मुसल्मान
लागला शेरवानी बी वापरायला, लाग्ला तीन् तनि्दा
वाकायला, ऐटिनं फिरवी गोंड्याला, जी जी

टाकून आपलं समूदंच काय होनार जी
नेक्टाय, बूट, स्टाकिंग काय करनार जी
घोंगडी कुटं ! हे सोंग उद्यां मरनार जी
सिग्रुट चहाचं ईर, बगा खिनभर, हाडं मनभर, मांस न्हाइ
ज्याच्या सरिराला, काय उपयोगी घेस्याला थूः थूः
असल्या जिनूगान्‍ीला, जी जी ६
अबिमानि असल त्यो बळी, घेव त्येचा बळी, धरम् त्येचा
बळी, घेव नामर्द पुळचटांचा, धरम नामर्द शिळपटांचा,
दुनियामंदि न्हाइ वाली त्येचा, जी जी

धरमाचं करावं रक्सन खऱ्या हिमतीनं जी
राखावं आर्य धरमाला उदार होऊन जी
बगूनृशान थर्र करावं इतर धरमानं जी
जोडितो हात समद्याला, राखा धरमाला, धरावं हिमतीला
घेव जय देइल आपुल्याला, मागतो असिरवाद आपुला,
कवी हनुमंत पवाड्याला जी जी ७



# शेतकरी.

लेखनकाल:——गणेशचतुर्थी १९३८.

[ तात्त्विक दृष्टीनें नव्हे तर व्यवहारांतील प्रत्यक्ष अनुभवानेंच खालील कविता लिहिली आहे. शेतकऱ्यांचा संबंध जसा गावगुंडाशी तसा बाजारगुंडांशींही घनिष्ठ असा येतो. किती संकटे त्याला सोसावी लागतात बरें? खालील कविता वाचून एवढ्या मोठ्या गुंडशाहीच्या तडाख्यातून आजपर्यंत शेतकरी जिवंत कसा राहिला याचें नवल वाटेल. शेतकीप्रधान भरताला अशा हलाखींत असेतों देशाच्या उन्नतीची काही आशा आहे का ? ]

जगांत साऱ्या एकजिवाचा शेतकरी ठरला
जगास साऱ्या जगवायाला तोच एक उरला.
झोपडींतला हीन दरिद्री जंगलांत बसुन
नंदनवन बनविले जगाचे, चहूकडे चैन.
सदा नागडा, उघडा, कधि ना चिंधि मिळे त्याला
सूट, पँट, रेशमी, जरीचे पुरवी तुम्हाला.
तीन दिसाच्या शिळ्या भाकरी मोडि दीनवाणा
पक्वान्नेही झोडायाला दिलींत सर्वांना.
असा जिवाचा शेतकरी जर एक दिवस मेला
अशा चैनिला कोल्हे कुत्रे ग्वातिल का बोला ?
त्राता तुमच्या ऐश्वर्याचा तोच असे एक
मोटारींचा पों पों होइल ऑफस् हकनाक.
अशा स्थितीला तयार कुणि ना स्वार्था सोडाया
हितचिंतक हे टपले त्याला पूर्ण लुबाडाया.
चहुंबाजूनीं टपणारांची इथें नाहि वाण
कैवारी या शेतकऱ्यांचे पहा कोण कोण.
दर गांवाला एक सावकार असतो मौजेनं

शेत पेरुनी धान्य पिकविले, आले तं झाला
आयत्या बिळामधिं सावकाराचा नागोबा बसला.
उरलें मुरलें गाडि भरोनी निघे बाजाराला
पहिला धक्का टोळटॅक्सचा कॉन्ट्रॅक्टर झाला.
दुसरा धक्का फार मजेचा, विना भाड्वलाचा
कुणी करावा धंदा त्यांच्या अशा दलालीचा.
पावसाळ्यामधि उगवावें अन् उन्हाळ्यांत मर
तैसे झाले कितीक धनवान्, किती दिवाळखोर.
एक पायली, मोठा काटा, लांकडि संदूक
कानामध्ये कलम् खोवुनी मुनीम् बसे एक.
सावज बघण्या जाउनि बसती कोस कोस दूर
पोटासाठीं लाजिरवाणी धडपड ही फार.
तिथें शिवेवर भांडभांडती बिछाइतापाई
तिसराच कुणी लाठ्याबहाद्दर खेंचुनि त्या नेई.
याच्यातर्फे तिसरा धक्का खरेदिदाराचा
माल पाहतां म्हणतो ' छे, छे, नको सौदा तुमचा
' दहा पांच शेर कडता देतां याला पक्तरिन '
आडत्या बघतो आडत आपुली देतो 'जी' म्हणुन
तिथें दक्षिणा मागायाला बामन ही आला
बेळेवाला गोळे खाउनि माडीमधि बसला.
आडत्या देतो मागेल त्याला 'दान' शेत्कऱ्याचें
त्याची बोहल्यावर × × × झाली, ह्यास काय त्याचें?
दुकानिं येतां, पोलीसदादा लेकर दंडेको-
' बैल मानेला जखमी झाला, चलो कचेरीको '
इतुकें होतां धिडवडे तो दिवस जाइ सारा
पैशाचा बाजार करोनी येई माघारा.
घरीं आला तों पाहतां बाइल, मुकी दीन पोरं
आणिलं नाही कांहि खावया, येती सामोर.

दुःश करुनि टेकला नाहि कीं आला एक दूत,
म्हणे 'चलावें सारा घेउनि चला चावडींत.'
तोंच शिपाई सावकाराचा तयार दारांत
जसा भासतो काळाचा हा कराल यमदूत.
दीन दुर्दशा नाहि संपली इथेच हो त्याची
करुण कहाणी दुर्दैवाची पुढे असे त्याची.
पोट जाळिती कुणी लावुनी भाडण आपसांत
अज्ञानाचा घेति फायदा नेऊन कचेरीत.
कचेरीतला वर्ग तयाचा हितचिंतक सारा
पिळून निघतो गरीब बिचारा शेतकरी पूरा.
राष्ट्राच्या कल्याणा झटला, झटेल आणखीही
वकील् वर्ग हा, त्यालाही पण आज पर्वा नाही.
किड्डक् मिड्डक्ही मोडुन करतो भरती वकीलाची
अपेश येतां काय पहावी दैना हो त्याची.
पहा बधुनो, विटंबना ही विचारांत घेता
जगात त्याला कोण राहिला वाली हो आतां.
वृक्षाचे हे मूळ आमुचे असेच जर कुजलें
नामशेष होईल देश हा, भविष्य मी कथिलें.
शेतकऱ्याचा देश आपुला घोरत कां पडला ?
'शाहण्याचा हो स्वार्थ बाधला' हें उत्तर त्याला.
सभा, बैठका, व्याख्यानाला येति थोर थोर
म्हणती सारे 'शेतकऱ्याचा करु या उद्धार'
उपाध्यक्ष कुणि, अध्यक्ष कुणी, कुणि हो चिटणीस
सगे सोयरे जैसे जमले घेत चहा डोस.
बहु मानाला हपापलेले पुष्कळसे लोक
म्हणे 'पुढारी' गरिबाचे हे, स्वार्थि सर्व एक.
शेतकऱ्यांच्या मुलाबाळांनां देशोधडि लावून
त्यांच्या रक्ताच्या पैशानें हो दिले महाल उठवून.

त्याच पेशावर आता म्हणती लौकिक साधू या
शाळा वा कॉलेज काढुनी नांव कमावू या.
बेइमानि हा समाज आपुला आहे जोवर
होइल कां हो शेतकऱ्यांचा कधितरि उद्धार ?
सवाल माझा खडा, विनवितो शाहिर हनुमंत
द्याया उत्तर धजेल कुणि कां गरीब श्रीमत ?

# किसाना ! —

लेखनकालः—जून १९४७.

[ निझामी राजवटींतील चुकीच्या व जुलमी लेव्ही पद्धतीमुळें शेतकऱ्यांवर अक्षरशः यमराजाची सांवली पडू लागली. हैद्राबाद स्टेट कॉंग्रेसनें प्राणपणानें खटपट केली, तरी जिथे आभाळच फाटलें तिथे ठिगळानें काय होणार ? मग नाइलाजानें खालील आरोळी शेतकऱ्याच्या कानावर पडल्यास काय आश्चर्य ? ]

( चाल– गझल् )

किसाना ! ऊट हो जागा,
पहा रे भोवती आपुल्या
आला हा क्रांतिचा काळ
'कोण तूं ?' सांग जगताला,
खरा तूं सिंहिचा छावा
ओळखी हिंदमातेला
नखें ती काढ बाहेर
दाखवी जुल्मशाहीला ,
भाकरी तोंडि कुत्र्याच्या,—
शिवाया ना कुणा हिम्मत्
सिंह तूं ! हें तुझें खाद्य—
नेति ना ! स्वस्थ कां बसला ?

# दीपावलि.

लेखनकाल— दिवाळी १९३४.

[ दिवाळी आणि दीपोत्सव हे ज्या काळी आणि प्रसंगीं अस्तित्वांत आले असतील तो आनंद, ते स्वातंत्र्य व तो मनाचा मोकळेपणा आजच्या दिवाळो-दीपोत्सवांत आहे काय ? ]

( चाल : शार्दुल वि० )

झेंडे नाचविले, स्वयें, निजबलें, वीरागणीं निर्भिड
कीं देहा बलि-मुक्ततार्थ—दिधले, काळासिही सांगड
लोकीं या, सुरमंडलीं दुमदुमे सत्कृत् यशोदुंदुभी
तेजें उज्वल लाविली जगिं, खरी दीपावली ही नभीं

गेले पूर्वज ! लोपलें यश हि तें, ते शूरधी सज्जन
द्याया पूर्वस्मृती परी उगवतो हा नम्रकालीं दिन
आतां टाकुनि फोल बोल, करण्या सत्तेज कीं त्या नव
कर्तव्या उमगेल कां कधितरी हा मंद दीपोत्सव ?



# चहुंकडे सजवूं नंदनवन !

लेखनकाल--सप्टेंबर १९४२.

[ कवि किंवा लेखक यांना स्फूर्तिदेवता प्रसन्न नसेल तर ते काय बरें करूं शकतील ? अनेक देवतांचें स्मरण करुनसुद्धा शेवटीं त्यानां स्फूर्ति-देवतेची आराधना करावी लागतेच. ]

उषा देवते ! निसर्ग देवी ! अरुणाची साजण
प्रभाती तुला असें वंदन
मातृदेवते ! दावियलें त्वां विशाल जग, जीवन
भक्तिचा भाव तुला अर्पण
राष्ट्रदेवते ! तुझ्याचसाठीं देह करूं तर्पण
नको हे पारतंत्र्य पैंजण
परि भयाण कां भासतें हृदय हें असें ?
कां स्फूर्ति-देवता मला कुठें ना दिसे ?
तिजविणें कार्य असहाय, भरे मज पिसें
स्फूर्ति देवते ! ये ये धांवुनि, हृदयाची स्वामिन
चहुंकडे सजवूं नंदनवन.

---

# महात्मा गांधी.

लेखनकाल---७३ वी गांधी जयंती.

[ महात्माजींचें चरित्र म्हणजे भारताचा अमोल ठेवा. तो प्राणापलीकडे जतन करून त्यांतील गूढार्थ क्रियाशीलतेनें वेंचला तर जगाला मानव्याचें दर्शन फार दूर नाहीं. ]

( चाल– ही एक आस. )

जन्मला शांततावादी, महात्मा
शांतिदूत गांधी ।

प्रसवली हिंदभू माता
तेजाळ बाळ आवडता
राष्ट्राचा विजयी नेता
यश-नाद मंडळा भेदी,
महात्मा विश्वबंधु गांधी, जन्मला ०

चाळीस कोटि हे दुबळे
दीन, हीन, दुःखी बनले
मग सौख्य कुणा तें कसलें ?
हृदयास लागतां व्याधी,
महात्मा गहिंवरला गांधी, जन्मला ०

पोटास नाहि खायाला
माणूस काय तो उरला ?
अभिमान सुचे कां त्याला ?
ओझ्यास कोणिही लादी,
महात्मा कळवळला गांधी, जन्मला ०

अंधार चहुंकडे पडला
साधली संधि चोराला
देश हा पुरा नागविला
उदयास येइ पुण्याब्धि.
महात्मा पूर्णचंद्र गांधी, जन्मला ०

पाहतां शांत तेजाला
लागले चोर भ्यायाला
लागला शोध देशाला
आधार जीवना खादी.
महात्मा संशोधक गांधी, जन्मला ०

खडबडे केसरी हिंद
चैतन्य भरे, आनंद
स्वातंत्र्य प्राप्तिचा छंद
लागला देश हा नादी,
 महात्मा क्रांतिदूत गांधी, जन्मला ०

'स्वातंत्र्य रणाविण कोठें?'
हें शब्द ठरविण्या खोटे
निर्मिलें अस्त्र तें मोठें
केवढें कार्य तो साधी,
 महात्मा सत्याग्रहि गांधी, जन्मला ०

संदेश जगाला दिधला
'सोडुनी असुर शक्तीला,
शांतीनें शांती बोला
पालटा हृदय ते आधीं,'
महात्मा जगन्मित्र गांधी, जन्मला ०

हें सार गांधी तत्वाचें
चिरकाल पृथ्वी मोलाचें
जो घेइ कृतीं कीं वाचें
संसार त्यास हा वंदी,
 महात्मा धन्य धन्य गांधी, जन्मला ०



# राजकुंवर.

लेखनकाल:—गणेशचतुर्थी १९३८.

[ देशद्रोह्यांची परंपरा हा हिंदुस्थानला एक शापच आहे. या उलट देशभक्तांची वाण आपल्या भाग्यशाली राष्ट्राला कधींच पडली नाही. जयचंद राठोड, सूर्याजी पिसाळ या मालिकेंतच इतिहास गणोजी शिर्क्यांची गणना करतो तर तोच इतिहास देशभक्तांच्या श्रेणींतच अनेक सतींचा सुवर्णाक्षरांनीं गौरव करतो. खालील पोवाड्याच्या काळीं महाराष्ट्रांत मराठी राज्याचा एक पाय बाहेर व एक पाय आंत अशी अनिश्चित परिस्थिती होती. अनेक नराधम वैयक्तिक द्वेषानें पछाडलेले होते. पण शिर्क्यासारख्या बिषारी भुजंगाला त्याच्याच नागिणीनें—पत्नीनें-राजकुंवरनें कसें नामोहरम केलें ? हा पोवाडा आख्यायिकेच्या आधारें लिहिलेला गृहित धरला तरी येसूबाई, अहिल्याबाईसारख्या महाराष्ट्रीय महिलानीं देशप्रेमापुढें आपला वैयक्तिक स्वार्थ कवडीमोलच लेखला ना ? ]

( चाल— पोवाडा )

रणमर्द गर्जला श्री संभाजी राणा,
टरटरा वाघ फाडिला फेंकलं जबड्याला,
घातला घोडा दर्यांत कापि शत्रुला
अजुनिही शत्रु कांपतो ज्याच्या नांवाला,
दैवाचं उलटलं मान, घाव संपूर्ण, घा।लि ब्राह्मण,
धिःक्क नीचाला, जी जी
कलुषाची जात ब्राह्मण, त्याला घेरलं स्वार्थ वृत्तीनं जी
भरविला संभाजी त्यानं, केलं शिर्क्यांचं शिरकाण जी
वांचला एक त्यांतून, केला घात त्याच शत्रूनं जी
घरभेदि गणोजी झाला, मार्ग दाखविला, छत्रपति धरिला,
हालहाल करुनि ठार केला, परंतू हिंदु म्हणुन मेला,
हिंदुधर्माला प्राण दिधला, जी जी १

जात मराठा, घरचा शत्रू होय मराठ्याला
अशा दुहीनें हिंददेश हा आजवरी बुडला
शंभू गेला, परी राहिला बाळ एक त्याला
रायगडावर केली स्वारी त्याला धरण्याला
किल्ल्यावर ठाकली उभी ती राजकुंवर बाला
आला पाहतां नवरा आपुला, घेउनि सैन्याला

लागला धक्का हृदयाला, पाहतां अशा नवऱ्याला, दिला दगा आधी भावाला, नव्हे मराठ्यांच्या राजाला, ( आणि ) आता बाळ धराया आला, हा असला कसला दादला, नवरा काय म्हणूं देशबुडव्याला, नवरा काय म्हणूं धर्म-बुडव्याला, हा नवरा नव्हें हे प्रेत, आलि संक्रात सौभाग्याला, केलं ह्यानं आज विधवा मजला, हे आर्य धर्म बोलला, मी खऱ्या आर्य रक्ताची आर्य बाला, भलं गडं दाजी, दादारं दाजी जी २

असं म्हणुन फुंकिलं शिंग, वीर रण रंग, मराठा दंग
खडबडुनि त्याला जागा केला, अष्टभुजा सजलि लढाईला,
मोर्चा तोफांचा फिरवीला, जी जी

धांवेल लाडकें बाळ बापाच्या आशिर्वादाला
बैसली समाधीपुढती लागल्या अश्रुंच्या धारा
फोडला दीन हंबरडा लागली बोल बोलाया

' हें स्वराज्य ना हो तुमचें ?
स्वातंत्र्य प्रेमि वीरांचें,
रणमर्द या मराठ्यांचें,
हा प्रसंग त्यांवरि आला,

कीं छत्रपतींचें पुण्य सरलें का आजच बोला ' जी
' तुम्हि सिंह समजुनी ज्याला हीं कन्या अर्पण केली
तो सिंह नव्हे, तो कोल्हा तरवार जाति वरि धरिली
जा, मी नाही म्हणणार ' हा नवरा माझा बाई '

दुःख ना मला नवऱ्याचें,
किंवा माझ्या वहिनीचें,
देशाच्या स्वातंत्र्याचें,
ते स्वराज्य बुडवायाला
म्हणवितो मराठा मांग धांवला अब्रु घ्यायाला ’ जी
समाधीनं कौल डावा दिला, कठिण काळ आला, अब्रुवर
घाला, मरण कधिं कोणाला चुकणार, राजसिंहिण खवळली फार,
झाली मग मरणाला तय्यार जी जी ३

शिवराय छत्रपति धन्य ! दिला जन्म अशा कन्येला जी
शोभला वीर संभाजी धाकट्या शूर बहिणीला जी
ती धन्य आर्य महिला जी—धिःकारि अशा नवऱ्याला जी

बांधिलं पाठी बाळाला, वहिनिला घेतलं संगतिला, लढाईचा कैफ तिला आला, तोफांचा मारा सुरू झाला, धडकतो येऊन बुरजाला, मग राजकुंवर ती बाला, गरगरां फिरवि डोळ्याला, चमकली बिजालि गगनिला, बाणांचा कहर तिनं केला, राखाया देश धर्माला, मराठ्यांच्या बाल राजाला, दैवानं अडविलं तिला, गणोजीनं फोडलं दाराला काळ उलटला, घेऊन शत्रुसेनेला आंत घुसला, भलं गडं दादा, दादारं दाजी जी

बघतांच बाळ आणि राणी तिकडं धांवला जी
त्यानां केलं हवाली शत्रूच्या, शांत जाहला जी
पाहिलं कपाळ बायकोचं कुंकु नाहि तिला जी

करकरा खाल्लं दांताला, लालीलाल झाला, म्हणे मग तिला,
‘ अजुनि हा नवरा नाहि मेला, कशापाई पुसलं कुंकाला ’
ऐका हो तिच्या जबाबाला, जी जी ४

‘ आर्यकन्यका शिवरायाची क्षत्रिय मी बाला
कलंक मजला लावाया तूं कोण कुठुन आला ?

नवरा माझा शिपाइ होता, क्षत्रिय रक्ताचा,
होता प्यारा छत्रपतींचा, सर्व मराठ्यांचा,
देशाचा तों शत्रू झाला तेव्हां तो मेला
लावुं कुण्या नांवानें कुंकू, नीचा सांग मला

ऐकुनी शब्द पत्नीचे सर्दला मेरु हृदयाचा
घामानें जणुं डबडबला थरकांप होय शरिराचा
भासला दृष्टि संभाजी विच्छिन्न देह तो त्याचा

हृदयाचा सुटला धीर,
पायावर पडले शरिर,
जहला ताप घनघोर,
करूं काय सांग गें मजला

हा माझा पापी देह, कोंडू की जाळूं याला जी जी
धाय धाय करी आक्रोश, बडवि छातिला जी
तोंडांत माति घेतली रडूं लागला जी
झाला कर्माचा पश्चात्ताप, दया नाहि तिला जी

कामिनी बोले नवऱ्याला, ' ताप जर झाला, जाई लढाईला,
अर्पि हें शरीर देशाला, मेल्यावर जाशिल स्वर्गाला,
भेटाया येइन मी तुजला ' जी जी ५

जाहला गडी बेफाम धांवला देशकार्याला
शौर्य, धैर्य एकवटोनी स्वातंत्र्य संगरीं लढला
परि लढतां लढतां मेला पावला पूर्ण सौख्याला

राजकुंवरला आनंद झाला ऐकुनि वार्तेला, कुंकू भरलं कपाळाला, घेउनि संगे नवऱ्याला, गेलि सती जाव स्वर्गाला,
स्वर्गाला हो भेटली बायको नवऱ्याला जी जी

तो जिवंत एकाचि देश शौर्य हें ज्यांत जी
तेजस्वी धर्म तो एक त्याग हा ज्यांत जी
स्वातंत्र्यरक्त खेळतें त्याच भूमींत जी

लागला रोग एम. ए. चा, सर्टिफिकेटांचा, रक्त आटण्याचा,
गेलें बलवीर्य लयाला पार, रोगी हे काय करूं शकणार,
अशानं देश कसा तरणार जी जी ६

## —ऋण—

लेखनकालः—गणेशचतुर्थी. १९४१.

[ आई, बाप किंवा सुहृद् यांचेपेक्षांही आज देशावर प्रेम करण्याची प्रत्येकाला गरज व संधी आहे. किंबहुना स्वार्थाकरितां भोंवतालच्या सजीव निर्जीव वस्तूवर प्रेम करण्यापेक्षांही सामुदायिक जिवन व्यतीत करण्याच्या प्रगत कल्पनेचा स्वीकार व तदनुरुप प्रत्यक्ष वागणूक हेंच आमचें श्रेष्ठ ऋण-विमोचन होय. ]

( चाल— रामनाम जपना रे. )

स्वार्थत्याग करुं या, रे
कितितरि झटतां पोट भराया
झटतां, खपतां, विटतां रे ॥ धृ ॥

आई, पिता आणि समाज देणें—
द्याया तुम्हां लागतें रे
मातृभूमि ही करिते आशा ॥ १ ॥

# – हिंदूंच्या चाली –

लेखनकालः—गणेशचतुर्थी. १९४०.

[ जुन्या बुरसटलेल्या तांत्रिक रुढीला कवटाळून खऱ्या वैदिक धर्माचा विसर हे आमच्या आजच्या सामाजिक ऱ्हासाचें मुख्य अंग होय. अनेक-भार्या योग, विधवाचा प्रश्न, अस्पृश्यता या गोष्टी आज अखिल भारताच्या दृष्टीनें घातक असूनदेखील बहुजनसमाज आपला अधःपात ओळखण्याच्या मनःस्थितींत—आज स्वातंत्र्य मिळालें तरी—नाही. साऱ्या जगानें तुच्छतापूर्वक हंसावें आणि आम्ही हा अपमान न ओळखून तशीच मान खाली घालावी हे किती दिवस चालणार ? तथापी या बाबतींत देशाच्या हिताकरितां खंबीरपणानें वागण्याची वेळ आली आहे. ]

पहा हिंदूंच्या चाली कशा,
हासते दुनिया आम्हां
नाहि कुणा कळत खरें -
वेदशास्त्र पहिलें
' भट सांगे पर्वकाळ '
हेंच खरें ठरलें, पहा हिंदू०

एक पत्नि मरतां—
- तय्यार लग्न दुसरें,
विधवेचें हृदय मात्र—
नेमकेच विसरे, पहा हिंदू०

चोर, जार, जरि ब्राम्हण
' श्रेष्ठ—जाति ' ठरला,
शूद्र जरी मंगल
'अस्पृश्य' करिति त्याला, पहा हिंदू०

# – वसईचा वेढा. –

लेखनकालः—गणेशचतुर्थी. १९३७.

[ महाराष्ट्राच्या शूरवीर मराठ्यांनीं पाश्चात्यांना आपल्या तिखट तरवारीचें पाणी अनेकवेळां पाजलें, त्यापैकीं ‘ वसईचा वेढा ’ हा प्रमुख ऐतिहासिक प्रसंग होय. ]

( चाल—पोवाडा )

वंदितो शंभु महादेव सुरांचा राणा
मग नमितो गणांचा धनी, शिवाचा कान्हा जी जी
मग करूनि रसिक वृंदानां हीच प्रार्थना
हनुमंत कवी वर्णितो वसईचा महिमा जी जी

पूर्वीचा काळ तो शूर शिपाईबाणा, ज्यांनं देश-धर्म रक्षिला
देउनी प्राणा, रणयज्ञ करी संगरी दिलें बलिदाना, तोडिला
घराचा मोह, अर्पिला देह, रणाच्या हवंना जी जी

कांपले थरथरां दाहिदिशांचे पाळ, गडबडला मृत्यु प्रत्यक्ष
जरी तो काळ, पाहुनी प्रखर तें तेज झाला व्याकूळ,
गर्जला यशाचा नाद, होत पडसाद, कीर्तिचे बोल जी जी १

गोव्यांत फिरंगी यांनीं मांडला च्छेद हिंदूंचा
बाटवी हिंदु जबरीनें जाहला प्रळय दुष्टांचा
वर्तमान कळलें जेव्हां गर्जला सिंह दःखनचा

दरबार पुण्याला भरला,
लाविला विडा पैजेला,
कुणी एक वीर ना धजला
पेशवा चिमाजी उठला

हा तयार माझा प्राण चालला धर्मसेवेला जी जी ॥ २

कृप, द्रोण भारतिय वीर तैसाच चिमाजी सजला
अस्सल ब्राम्हणी बच्चा जागला खऱ्या ब्रीदाला
आर्यधर्म राखायाला प्रत्यक्ष रणीं अवतरला
रक्तानं धूतलें अंग
सोवळें तयाचें खड्ग
कापुनी शत्रुचें अंग
देतसे अर्घ्य सूर्याला
तो खरा आर्यधर्माचा अधिकारी पालनवाला जी जी
आजचा पहा ब्राम्हण जो कलंकिला नांवाला
अधिकारी जो धर्माचा मारितो तोचि धर्माला
सोडुनी धर्म मार्गाला स्वार्थांध, मूर्ख जो बनला
यांनी केलें तूप महाग,
पोळिचें माजलें बंड,
दक्षिणा मिळे आखड
हा कलंक ऋषिवर्याला,

निस्वार्थ तपाचे तेज तारिलें ज्यांनिं धर्माला जी जी
फेंकला घोडा भरधांव, देवाचं नांव, वाऱ्यापुढं धांव,
मिळाली नाही सायकल हो त्याला, रिस्टवॉच नव्हतं हाताला,
तलवारीचा पट्टा चढवीला, जी जी

वसईचा किल्ला अवघड, भयंकर धूड, पाणी तीन्हीकडं,
जमीन हो एका बाजूला, चिमाजी वीर नाही डरला,
लाविले मोर्चे बुरुजाला, जी जी

ते नव्हते बुंदिचे गोळे, धडकती गोळे, तोफा गरनाळे,
जिवाच्या सोडलं आशेला, धन्य केलं आईच्या कुसव्याला,
‘ मायेचा पूत ’ आज कुठला ! जी जी

चतुरंग वीर गर्जला, ' हर महादेव ' बोलला, धडकतो येऊन बुरुजाला,
रणशूर मराठा भाला, खण् खणा आवाज चालला, तीन दिवस
केलं युद्धाला, पण नाहि किल्ला सर झाला, मग चिमा वीर भडकला
शाहीर सांगतो आतां त्याच्या बोलाला, जी जी ४

" जर नाहि किल्ला सर झाला, आज पहाटेला, उडवा डोक्याला.
भाग जरि किल्ल्यामधिं पडला, सार्थक येऊन जन्माला, नेऊं कुठं काळ्या
तोंडाला " जी जी

उसळला खरा तो ' हिंदु ' बोल बोलला जी
पांडित्य फुकटचें इंग्रजि शिकणाराला जी
जो पळतो भिऊन तीन कोस बघुन शस्त्राला जी

ऐकुनि ऐसी भाषा त्याची, रक्त हिंदूचें, बाहू फुरफुरले साचे,
घेऊनि नाव देवाचें, चहुंकडे सुरुंग लाविले, लाविले हो
किल्ल्याला भोक पाडिले जी जी ५

धांवती आंत नरवर, सेनासागर, देऊनी हार, फिरंगी
लालबुंद झाला, आगीचा सारखा मारा केला,
आर्य धर्माचा विजय झाला, जी जी

जाहला पसार फिरंगी परि एक राहिली अबला
आणिली चिमाजी पुढतीं घाबरे फिरंगी बाला
सौंदर्य तेज पाहोनी पेशवा थक्क तो झाला

बोलला वीर मधुवाणी
' परनारी आमुची भगिनी
सद्धर्म गाजतो भुवनीं
जागतो आर्य ब्रीदाला,

कर्तव्यकर्म जो चुकला, बीजांत फरक त्या झाला,' जी
नेसवोनी काकण चोळी सजविली बाला जी
सौभाग्यवाण देउनी पोंचविलि तिला जी
वाढविली कीर्ति धर्माची, डंका गाजला जी

पतिव्रता बोले नवऱ्याला, ' शत्रु जरि झाला सत्य वागला,
रणांगणि विजयी तो ठरला, नका जाऊ त्याच्या वाटेला,
होऊ नका धनी अपेशाला' जी जी ६

हा एकभाव संगरी, तमा नो घरी, सर्व अंतरी,
वाढला महाराष्ट्रधर्म, एकिचा प्रभाव हें मर्म, आज परि
ओढवलें कर्म, जी जी

श्रीराम एकाचा देव दुसऱ्याला कृष्ण आवडला
कुणि करतो बुड-ड हरशभो कुणि उदे उदे गर्जला
छत्तास बुद्धिचे छंद नालायक हे जगण्याला

जो समाज हो बलवत
त्याचाचि देव यशवंत
त्याचाचि धर्म जयवत
तो अजिंक्य या दुनियेला
जिथं शक्ति बुद्धिचे ऐक्य, झुकवितो तोच जगताला जी जी ७



# स्वातंत्र्य मिळतांच—

लेखनकाल:—गणेशचतुर्थी १९४५

[ १९४२ च्या अजस्र स्वातंत्र्य-आंदोलनाचें वेळेपासून सतत तीन वर्षाच्या प्रदीर्घ बंदिवासांतूच बाहेर पडताच आपल्या श्रेष्ठतम नेत्यांना काय बरें दिसलें? साम्राज्यशाहीला गळती लागली आहे, दुसऱ्या महायुद्धानें ती खिळखिळीं झाली आहे. त्यांच्या प्रत्येक व्याख्यानांतून अगदी प्रथमच आपलें हाताशी आलेलें नवोदित स्वातंत्र्य प्रतीत होत होतें आणि त्याचवेळीं आपणां सर्वांच्या मुखांतून भावी स्वातंत्र्याची कल्पना खालील कवितेच्या शब्दांत बाहेर पडत नव्हती काय? ]

( –चाल सखे ग वसंत फुलला )

पहा किति बहार फुलली जनीं
बदलेल रंग तांबडा,
बाकिचा होय बापुडा,
मग तिरंगि झेंडा खडा–
उमटेल हिंद रंगणीं, अहाहा किति बहार०

वाहेल देशांत स्वातंत्र्यवारा,
आनंदी आनंद कोंदेल सारा,
खोट्या श्रीमंतीचा उतरेल पारा,
सारे थोर सान–
होतील समान
गातील मोठ्यानं
‘ भारत आमुचा भारत, ग ’
घुमेल अवघ्या भुवनीं, अहाहा किति०

---

# आझादीका जमाना.

लेखनकालः—गणेशचतुर्थी. १९४५.

[ हिटलरच्या फॅसिस्ट हुकूमशाहीचा–नाझी राजवटींचा इंग्लंड, अमेरिका इ० लोकशाही पुरस्कृत व साम्यवादी रशिया आदि राष्ट्रांनी नायनाट केला. त्यावेळीं दोस्तांनीं इतर राष्ट्रानां अनेक आमिषें दाखवून मदतीस घेतलें. त्यापैकीं सर्वांकरितांच 'लोकशाही व स्वातंत्र्य' या मोहक घोषणेचा मुक्तकंठानें 'देकार' पुकारला होता. भारताला त्यावेळीं थोडें हायसें वाटलें.

(चाल– गझल )

आझद था समंदर आझाद थी जमीं
कल्तक् बजा रहा था डंका हर आदमी
पैदा हुवा यकायक् युरप्के टुकडे पर
हिट्लर के नाम नाझी फॅसिस्ट नामवर

ये आग लग् गई थी दुनियाके हर सिरे में
जानें तडप् रही थी दुनियाके हर गली में

सारा युरोप जीता हप्तोंमे फ्रान्स को
थर्राइ सारी दुनिया हिट्लर के नामको
आया करीब नाझी आपने हि कयामतके
निकली है लाल दुनिया तल्वार खींच करके

एक तरफ 'लाल झेंडा' आगे 'युनीअन जॅक'
धीरेसे अमरिका का बहादुर हुआ मिलाफ
दोस्तोंने दी आवाजें 'दुनियावी सब उठो
आझादी की हिफाजत् आपने करो उठो'

घेरा है चौतरफ्से हिटलरका नाझिझम्
बर्लिन की चोटीपरसे गिर आया एकदम्
दुनियाके नक्शे परमे नाझी हुवा खतम्
हिट्लर खतम हुवा है उसका हुवा रसम्

चालीस् करोड हिंदी एक लफ्जसे पुकारो !
'आझाद् हुई है दुनिया अब अपनेको संवारो !
दुनियामे कोई नीचा,- ऊंचा, गुलाम न होगा
हिंदूस्तान में भी- डंका बजा रहेगा

"अब फिर शुरु हुवा है आझादीका जमाना
अय दुनियावाले बंदों नाचो व गावो गाना,"

# हा न्याय?-

लेखनकाल:—गणेशचतुर्थी. १९४५.

[ गुलामगिरींत ' जखमेवर मीठ ' हे प्रसंग वारंवार येतात. आपल्या मालकाचे कोड उपाशी पोटीं देखील पुरविणें हा गुलामीचा एक अस्सल नमुना आहे. कारण त्यांत गुलामाच्या आशेला जागा नसते. ]

( चाल- अये चांद छुप ना जाना )

हा न्याय कसला झाला ?
उगि आम्ही कां मरावें ?
पोटाला नाहि खाया
जुलमानें का झटावें, हा न्याय०

मेलो जरी उपाशी जरि त्राण कांहि नाही
' लढलेंच पाहिजे ' हा अन्याय काय नाही ?
फळ या बहाद्दरीचें ? सत्ताच देइ फांशी.
हा न्याय कसला (?)

# — ऊठ हिंदवीरा —

लेखनकालः—गणेशचतुर्थी. १९३९.

[ भारता, ? ऊठ ! समता, ऐक्य, शिक्षण या तीन गुणांनीं अगोदर आपल्या देशाला युक्त करूं. मग स्वातंत्र्याचें मंदिर ते कितीसें दूर ! हाच नाही का खालील काव्याचा भावार्थ ? ]

उठ ऊठ हिंदवीरा ! तुज राष्ट्र हांक मारी
मिळवोनि वीर सारे करुं ये आतां तयारी ।
समता आधीं कराया हा देश एक व्हाया
भगिनी नि बंधु आज चल होऊं ये पुढारी ।
असतील जे अजाण शिकवोनि ज्ञान त्यानां
अवघे करुं शहाणें हा छंद घेऊं भारी ।
मग तोडशील बारे परदास्य हें विषारी
यश-मंदिरास जाया चल मारुं ये भरारी ।

विजयी होतां, भारतमाता
सुखी आम्ही बनूं रे
चिरस्थायि ही क्रांती शोधाया
चला चला रे उठा उठा ॥

*

# – पानीपत –

लेखनकालः—गणेशचतुर्थी १९३९

( इ. स. १७६१ चें 'पानिपतचें युद्ध' म्हणजे हिंदुस्थानचा सर्वांत मोठा बदल. देशांतील एकंदर शक्तींनां न सांवरण्यासारखा धक्का बसला असेल तर तो याचवेळीं. अर्थात् या खंडप्राय देशांतील स्वार्थाच्या –बेकीच्या– परंपरेनें या युद्धांत कल्पनातीत यश मिळविलें. त्यामुळें जवळ जवळ पुन्हा दोनशें वर्षेंतरी भारताचा भाग्यकाल लांबला व तिसऱ्याच शक्तीला भरपूर खाद्य मिळालें. )

( चाल– पोवाडा. )

कुरुक्षेत्रिं उडाली धामधूम, हिंदुइस्लाम, लढले बेफाम,
लाखो जीवांचा सडा पडला, यशाला कोणि नाहि उरला,
गातो हनुमंत पवाड्याला, जी जी

पुण्यामधीं दरबार शोभला गणेश महालाला
राव पेशवा नाना सजला आसनिं बसलेला
मानकरी आणि सरदारांनीं महाल गजबजला
तोंच एक जासूद धडकला, सांगे बातमिला
'कुतुबशहानें दत्ताजीचा खून अहो केला
खून करुनि नीचानें त्या लाथेनें ठोकरिला'

खडबडला पुणें दरबार एकच झाला कल्लोळ
उतरलें रक्त डोळ्यांत भासला जसा इंगूळ
चमकल्या नंग्या समशेरी कुणि सोडला पट्याचा सळ

गडगडला मराठा भला, धिःकार आम्हा षंढांला, धिःकार आमच्या जीण्याला, कालिमा कसा आम्हाला, लागला बट्टा मानाला, मराठ्यांच्या शुभ्र कीर्तिला, मराठ्यांच्या जरीपटक्याला मराठ्यांच्या भगव्या झेंड्याला,

काय वाटंल राव शिवबाला, मिळविलं ज्यानं मावळ्याला, जिंकिलं कितिक राबाला, दरदरलं तक्त त्यावेळां, दिल्लिच्या क्रुर बगळ्याला, बिरबिरा गुंगविलं त्याला, ऐशी थप्पड दिली कोल्ह्याला, जिथल्या तिथं मुद्दा गार केला, स्थापिलं मराठी राज्याला, काय वाटंल त्याच्या आत्म्याला, रणसिंह शंभु राजाला, धर्मासाठीं प्राण ज्यानं दिला, मानासाठीं देह अर्पिला, दाविली शक्ति गोऱ्याला, ज्याचा आज एवढा बोल्बाला, तसं बाजीराव पेश्व्याला, पुण्याहून सोड्लं घोड्याला, पाणी पाज्लं दिल्लि चौकाला, ज्यानं राज्य नेलं कळसाला, लाविला झेंडा अटकेला, काय बोलतील आम्हाला, ‘ कसे सारे षंढ तुम्हि झालां, हा डाग सहन कसा केला, सहन करुन जिवंत कां राहिलां, मराठ्यांचा बाणा कुठं गेला, आग लागो तुमच्या शौर्याला, कुणि म्हणावं मर्द तुम्हाला, खरे खरे बाइले झालां, कशि लाज नाहि तुम्हाला, काय भरलं आज बांगडीला, थुंकेल सारं जग आतां तुमच्या नांवाला, ’ जी जी

गर्जला सिंह डरकाळी फोडि गुरगुरुन
ठाकला सदाशिव भाऊ उभा सरसरुन
खवळला जसा तो रुद्र जाळितो भुवन
कीं भुजंग करि फूत्कार फणा उचलून
रागानं कांपतो तसा भुजा पसरुन
तो प्रसंग दरबाराला फार भीषण
पाहती भाउकडे सारे लक्ष वेधून
आता इथं काय घडणार, काय होणार,
पुढं सांगेन, जी जी १

आकाशीच्या मेघमंडळीं गडगडाट झाला
तसा भासला शब्द भाउचा, कानीं घणघणला
“ शिंद्यांचा अपमान नव्हे हा भर दरबाराचा
महाराष्ट्राच्या शिवरायाचा, मराठशाहीचा
सह्याद्रीचा धनी मावळा कधी नाहि मेला

जिवंत आईपोटिं जन्मला, तिचें दूध प्याला
शूर मराठा अपमानाचा घ्याया मोबदला
छातीवर नाचला, नाचतो, सिद्ध नाचण्याला.'

'घनघोर प्रतिज्ञा माझी सारे या ऐकायाला
स्वातंत्र्य-देवि ही साक्ष- ठेवोनि बोलतो बोला
'मी खरा ब्रम्हबीजाचा घेईन सूड या काला
नातरी प्राण हे माझे अर्पीन धर्म क्षेत्राला'

दत्ताजी भाई माझ्या स्वर्गांत शांत हो बाळा
तुज नाहि मारिली लाथ हा प्रचंड धक्का मजला
नीचाच्या त्या रक्तानें तर्पीन तुझ्या आत्म्याला

उतरण्या शत्रुचा माज,
राष्ट्राची राखण्या लाज,
लावितो पणाला आज
तीन लाख धर्मसैन्याला
बिनमोल एक जीवाचे स्वाधीन तुझ्या सेवेला' जी जी

'हरहर महादेव' नाद गर्जला, स्वातंत्र्याचा मंत्र बोलला, कोल्ह्यानें हा सिंह डवचला, 'सूड, सूड' हा एक गलबला, सूड घ्यावया वीर निघाला, होळकरांचा विजयी भाला, जनकोजी जणुं सिंह भासला, आघाडिला पटवर्धन झाला, दाभाड्यांचा शूर काफिला, गायकवाडी वीर निघाला, मांड ठोकुनी निघे भोसला, मर्द मावळा पवार आला, बुंदेल्यांचा खडा रिसाला, विंचुरकरही तिथें शोभला, सखाराम अश्वारुढ झाला, नारो शंकर तिथें झळकला, हरिपंतांनीं साज चढविला, गोलंदाजी वीर खरा, इस्लाम बंधु गारदी चमकला, धड्धड् धडाड् धडकला, सुटला तोफेचा जणुं गोळा

सांभाळाया घरीं राहिले बाळ आणि वृद्ध
झाडुनि सारा निघे मराठा, लढावया सिद्ध
कुणी घेतला निरोप आईचा, आपल्या बहिणीचा,
कुणी घेतला वडिलां चोरुनि निरोप प्रेमाचा
विजयाचा ‘ विश्वास ’ असा विश्वास असे ज्याला
बोल बोलला ‘ मीही येतो स्वधर्म यज्ञाला ’
बाळ-बाळसें नाहि मोडलें ज्याच्या शरिराचें
अंगि भडकला रणरागरंग, स्फूर्तीनें नाचे
ऐकतांच बोलले भाऊ ‘ तूं लहानगा बाळ,
आम्हीं करावा वडिलांनीं रे तुझाच सांभाळ. ’

ऐकतां शब्द भाउचे थरकला बाळ
गहिंवरुन म्हणे, ‘ मी काका शत्रुचा काळ, ’ जी जी

‘ काय जावं माझ्या फौजेनं रणीं मरण्याला ?
जन्मलो तुमच्या वंशिं कां घरीं राहण्याला ? जी जी

नादान जिणं मी नाही पत्करणार
लढणार क्षात्र-अंगणीं, तिथं मरणार ’ जी जी

असं बोलून बाळ विश्वास झाला तय्यार, गडबडिनं गेला महालांत येइ सामोर, नवपत्नि लक्ष्मि सुंदर करी सत्कार, झाले सहा महिने लग्नाला नवीन संसार, अचानक चरका मनाला लागला घोर, ऐकोनि म्हणे ती बाला ‘ मीहि येणार ’ घेतलं संगं बाईला, घोर नाहि त्याला, सरळ नीघाला, रणांगणिं वीर जी जी २

ठिकठिकाणिं मुक्काम करोनी राष्ट्राची सेना,
चालली लढण्या वा मरणा, जी जी

कुणी पायदळ, कुणिं घोड्याचे स्वार कुणी होत,
बैसले कुणि अंबारींत, जी जी

रणगाड्यांची रांग लागली, अजस्र तोफांची,
वाघिणी जणु तोंडें ज्यांची, जी जी

मध्यभागिचा भगवा झेंडा डोलत झोकानं,
'जयश्री' ही ज्याची खूण, जी जी

कुरुक्षेत्र जंगि मैदान इतिहास वर्णितो ज्याला
हो सडा आर्य रक्ताचा भारती युद्धकालाला
जो वीर लढाया गेला कुणि नाही परतुनि आला

त्याच ठिकाणीं तंबु ठोकले यमुनेच्या तीरीं
वाजल्या तिथेंच रणभेरी, जी जी

शहा अब्दाली, नांव दुराणी, जो इराणवाला,
आला घेवोनी फौजेला, जी जी

हिंदभूमिचे कांहीं मिळाले राजे हो त्याला
मिळाल्या सेना लष्कराला, जी जी

'बडा पेशवा शहर पुनेका मग्रुर शैतान,'
जिंकिलं ज्यानं हिंदुस्थान, जी जी

मुसलमान आणि हिंदी राजानीं आणिलं शहाला
पेशवाई सारी बुडविण्याला, जी जी

त्या प्रचंड दोन्ही फौजा आल्या एकमेकां सामोर
उभयतां टाकण्या झेंप विक्राळ सिंह आतूर
जणु प्रळय जगाचा होतो सारे झाले चिंतातूर

गडगड गड रणनाद गर्जला, भिडली समशेर
दाहि दिग्पाल झाले थर्र, जी जी

घोडेस्वार भिड्ला स्वाराला, हत्तिशीं हत्ति झुंजला, वीरानं घेरलं वीराला, हातो हात गडी उडाला, धडावेगळं करी शीराला, जसा चेंडु उडे गगनिला, रक्ताचा पाट चालला, मांसाचा चिखल हो झाला, अगणीत गडी ठार झाला, एक होता मुल्गा शहाला, लागली गोळी हो त्याला, 'या अल्ला अल्ला' बोलला, धाडकन् पड्ला धरणिला, महाराष्ट्र–वीर विजयानं 'हरहर' बोलला, जी जी

पडतांच शहाचा मुल्गा दुराणी सेना–
भयभीत झाली हो त्यांची उडाली दैना, जी जी
लागले पळाया मुठीं घेउनी जीव,
पळतात आणि पडतात झाले निर्जीव, जी जी
तेव्हां होता आपल्या तंबूत शहा अब्दाली
ऐकुनी मरण पुत्राचें म्हणे 'या आली,' जी जी
दुःखानं झाला बेफाम, आला बाहेर,
ताजी फौज घेउन नीघाला पन्नास हजार, जी जी

अजिंक्य जी समशेर अजुनि ती म्यान नाहि केली,
आकाशीं तों धुरळा दिसला, नवी फौज आली
विश्रांती स्वप्नींहि नसे तो शिवबाचा चेला
रणदेवी संचरली अंगीं, पुन्हा सज्ज झाला
दुर्दैवाचा पहिला फटका भगव्या झेंड्याला,
होळकर तो मल्हारराव बाजूला फुटला
म्हातारा जणुं भीष्म, कडाडे शत्रूसैन्यांत
नांव ऐकतां मान टाकिती, सारे चळचळत
चाळीस हजार फौजेचा मालक, भरला अभिमान
डोळे भरुनी आले भाउचे, बोले विनवून,

' ही वेळ आणिबाणिची, राखाया देश-देव-धर्माला,
नका सोडुन जाऊं आम्हाला

हें राज्य, मराठी साम्राज्य, राखिलें आजवरी तुम्हि काका
नका धरूं आज हो हेका
राज्य हें नाहि पेशव्यांचें, परंतू तुम्हां आम्हां सर्वांचें
स्वातंत्र्य लोकशाहीचें
दारांत शत्रु ठेपला, चला हो उठा हातीं घ्या भाला
नका करूं घात या वेळां ॥

दगडाला फुटावा पाझर दयेचा ओला, विनविलं अशा शब्दानं मल्हारकाकाला, पाषाण–हृदय, नाहि त्याला कळवळा आला, धिःकारुन साऱ्या शब्दाला दूर तो झाला, एकीचं वावडं दिसतंय हिंदी लोकांला, उंटावरचा शाहणा साता समुद्रापलीकडला, राखितो आज चाळीस कोटि-मेंढराला, हे जिणं, तिथं काय उणं, गुलाम होउन आज राहिला, जी जी ३

सन् सतराशें एकसष्ट, वर्ष अति नष्ट, केलें आम्हां भ्रष्ट,
लाभलें नाही देशाला, भाग्याचा पूर्ण अस्त झाला,
गुलामी आली नशीबाला, जी जी

जानेवारी सात तारखेला, तीन प्रहराला, भड्का उडाला,
हाय ! दैवाचा घाला पडला, हिंदभूमीचा तारा तुटला,
बाळ विश्वास रणीं पडला, जी जी

अभिमन्यु बाळ कोंवळा, दया नाहि काळा, हाय हाय बाळा,
बाळानं हट्ट पुरा केला, चक्रव्यूहांत तसा घुसला,
गाजुनी गेला स्वर्गाला, जी जी

पाठिशीं पत्नि सुंदर, किती जरि शूर, किती जरि धीर,
चरचरत भिड्लं काळजाला, तिचा सौभाग्य-सूर्य गेला,
देह साराच बधिर झाला, जी जी

झटकन् आली भानाला, पाहे गलबला, विचार थोडा केला,
थोडं जर कळलं सैन्याला, राया आपुला स्वर्गि गेला,
मराठा सोडिल धीराला, जी जी

धन्य धन्य वीर माउली, धन्य जाहली, भूमि–मंडळीं,
नीट बसवोनी प्रेताला, दिलं हातांत धनुष्याला,
हिंदभू उधळी सुमनाला, जी जी

बातमी अशी झांकून नाहि राहत जी
अत्यंत शोक पसरला साऱ्या सैन्यांत जी
कोल्हाळ सारा चहुंकडे झाली वाताहत जी

भाउचा घोडा हादरला, कळ्लं हो त्याला, बाळ रणिं पड्ला,
चित्ताचा ठाव त्याचा सुटला, कुठं गर्दींत गप्प झाला,
ठावं नाही अजुनी आम्हाला, जी जी

हा भूतकाळ इतिहास वर्णितो साचा, इस्लाम आणि हिंदूंच्या रक्त-मांसाचा, कोणीच नाहि जाहला धनी विजयाचा, भांडले दोघं आपसांत लाभ तिसऱ्याचा, जाहली माय परतंत्र डाग कायमूचा, अजुनिही तेंच दुर्दैव खेळ बेकीचा, नरवीर कुणी नाहि कां हिंदमातेचा, स्वातंत्र्यलक्ष्मि ही पुन्हा, खेचुनी आणा, धैर्य हें कुणा, कोण धजणार ? जी जी ४



# ....कृतार्थ हो ! –

लेखनकाल—दिवाळी. १९४६.

[ ‘ आपण त्या गांवेचेच नव्हत ’ या विचारानें बाजूला राहून, केवळ स्वतःची करमणूक म्हणून एखादा टिंगलवजा विषय हाताळणें हाच ज्यांचा सतत उद्योग असे किती तरी सुखी महाभाग ( ! ) समाजांत आढळतात. भोंवती काय चाललें आहे किंबहुना त्याचा आपल्या जीवनाशीं कांहीं संबंध पोंचतो काय ! याचा विचार करण्याइतकी देखील सवड या रिकामटेकड्यांना —छेः छेः अखंड सुखवस्तूनां मिळत असेल कीं नाहीं हे त्यांच्या सवडी-प्रमाणें त्यानांच विचारावयास हवें. खालील कविता त्यांच्या कानीं केवळ ‘ टाहो फोडणें ’ एवढेंच काम करील कां ! ]

( चाल—प्रीत तुझी माझी. )

ऊठ हिंदवीरा ! चल पहा विशाल दृष्टीतुनी ॥धृ॥

तुझा देश हा नव तरुणांचा
स्वातंत्र्याच्या समीप साचा—
आला ना ! आवाज यशाचा
जाग गीत ऐकुनी, चल पहा०

स्वातंत्र्याच्या या प्राप्तीस्तव
फांशीं गेले कितीक नवयुव
दाद तुला ना काय कुठें नव
ऊठ उकिरड्यांतुनी; चल पहा०

सडा पसरला जइं रक्ताचा
सत्याग्रहि त्या नरवीरांचा
अखेरचा आवाज तयांचा
ऐक कान फोडुनी, चल पहा०

' सुखी, रिकामा असाशिल जर, तर–
रिकामूटेकडी बनवुं नकी घर
आयुष्याचें सजवी मंदिर
देशाच्या अंगणीं, चल पहा०

देशभक्तिचा दरिया भरला
कधीं बहरला, कधिं ओसरला
तव त्यागाचा थेंब एकला
कृतार्थ हो टाकुनी, चल पहा०

---

## – नाहि एकी –

लेखनकाल :– सप्टेंबर १९४५.

[ अगोदरच जातीयवादानें देशाचें ' न भूतो न भविष्यति ' असें वाटोळें केलें आहेच. आतां पुन्हा या प्रांतीयवादांतून जातीयवाद नवीन स्वरुपांत पुन्हां अवतरणारच नाही याची खात्री कुणी देईल का ? ]

( चाल–प्रेमकी प्यासी. )

नाहि एकी, अजुनिहि बेकी
नशिबी गुलामि आली
तुझा देश जणुं प्रेत होतां
नाही कां स्थिति कळली ?

म्हणे " हिंदु आम्ही " " इस्लाम " कुणी
" शीख " कुणी, " हरिजन " आम्ही

स्वार्थ साधुनी देश गमविला
सोडुनि द्या या चाली ।

# गरिबांची सरली दैना—

लेखनकाल—२५ ऑगस्ट १९४६.

[ स्वातंत्र्याच्या कल्पनेचा आनंद कुणाला नाहीं ? विशेषतः गरीबांनाच आर्थिक विषमतेमुळें—स्वातंत्र्याची खरी अवश्यकता आहे. आणि म्हणूनच कसल्याही दिव्यांतून अगोदर गरीबच जातो तो वरील आकर्षणामुळेंच. त्याच्या अपेक्षा तो खालील गीतांत व्यक्त करीत आहे. ]

( चाल—तुम्हि याहो जनहो )

गरिबांची सरली दैना
ते गातिल गोड गाना ।।धृ।।

नाचति आनंदानें,
देशाच्या स्वातंत्र्यानें,
स्वातंत्र्य-दिवस हा आला
आधी गरीब कितितरि मेला
स्वातंत्र्या ——
मिळवाया ——
फांशीला चढला ना ! हा गरीब०

शेती असुनी प्रचंड ही
होइ इथें बंगाल,
त्याचें असुनी त्या न मिळे
झाला का कंगाल ?

गरिबांचे सम्राट नेहरू, तुम्ही बोललां होतां
निर्धारानें तुम्ही करावा बोल खरा तो आतां,
ही सुवर्ण संधी आपणां, गरिबांची०



# नर–केसरी––

लेखनकाल–सप्टेंबर १९४३.

[ महाराष्ट्राचा मराठा आपल्या शब्दांत अखंड भारताला हांक देत आहे. सुषुप्तावस्थेंतून जागृतावस्थेत देशाला आणण्याकरितां किती तरी महनीय पुण्यात्मे खर्ची पडले ? ]

नरकेसरी खरा तूं विकराल सिंह-छावा
उठ ऊठ हिंददेशा ! स्वातंत्र्य हें वराया ।।धृ।।

कां झोपलासि शूरा ! वर्षें कितीक गेली
आला पहा शिवाजी तुजलाच जागवाया ।

घेवोनि एक हातीं ती कोयतीं, कुऱ्हाड
जमलेत मावळे मराठे तुजलाच बोलवाया ।

जाळींत वाघिणींच्या– शिरुनी उभाच फाडी
रणसिंह शंभु राणा आलाच हांक द्याया ।

बंगालचा हुतात्मा खुदिराम बोस तुझा
ते सिंग, दत्त आले संदेश हाच द्याया ।

‘ स्वातंत्र्य हक्क माझा आहेच जन्मसिद्ध ’
तो लोकमान्य गर्जे तुजलाच चेतवाया ।

हा आर्त बोल ऐक तो बोलतो महात्मा
‘ अन्याय दूर करण्या, तूं सिद्ध हो मराया ’ ।

# — जयहिंद —

लेखनकाल—जून १९४६.

[ ६ व्या महाराष्ट्र परिषदेच्या अधिवेशनांत तयार करून गाइलेलें हें गीत अध्यक्ष श्री. आ. कृ. वाघमारे यानां जनतेच्या अपेक्षा ऐकवत आहे. स्वागत करीत असतांना हळुवारपणें आपलें हृदय मोकळें करणें म्हणजेच नेत्यानां त्यांच्या जबाबदारीची जाणीव देणें असा त्याचा अर्थ होईल कां ? हें धाडस आहे. पण तें केलें आहे. ]

जयहिंद, जयहिंद, जयहिंद, जयहिंद !
नव्या मनूच्या नवतेजानें
नव्या शक्तिच्या चैतन्यानें
नव्या स्फूर्तिच्या उंच रवानें
स्वागत करि हा हिंद, जयहिंद०

जरी स्तुतीचा तुला उकाडा,
निर्मियला का ' मराठवाडा '?
बावरला सत्तेचा गाडा !
तुवां लाविला छंद, जयहिंद०

अनंत हस्तें जन मेळवुनी
लोकशास्त्र हे घे परजोनी
गुलामगिरिचा वाघ मारुनी
तोड शृंखला—बंध, जयहिंद०

सत्तेचा मदमस्त पसारा
जगीं पसरला हा बघ सारा
लोकशाहिचा शांत निवारा
एकच आशावृंद, जयहिंद०

विलगूं पहाती चाकें दोन
नव्या शक्तिनें सांभाळून
स्वातंत्र्याची गाडी जोडुन
चाल पुढें बेबंद, जयहिंद०

तुझ्या यशाची कीर्त ऐकली
मान तुला जनतेनें दिधली
शब्दाकरितां उभी ठाकली
जनता ही कटिबंध, जयहिंद०

चाळीस कोटीच्या दरबारीं
प्रकाश उमटवुं ये हा भारी
हीच विनंती महाराष्ट्र करी
राख आपुलें ब्रीद, जयहिंद०



ज य हिं द !

# – सुभाषचंद्र बोस –

लेखनकाल —गणेशचतुर्थी. १९४५.

[ देशगौरव सुभाषचंद्र बोस यांना न ओळखणारा आज तरी– व पुढेंहां-कोणी नाही. त्यांच्या आयुष्यांतील एक दोन ठळक प्रसंग खालील पोवाड्यांत वर्णिले आहेत. ]

( चाल– पोवाडा. )

भारताचा कोहिनूर हिरा, तेजस्वी तारा, आमुचा प्यारा,
' देश गौरव ' जयाला मान, प्रसवुनी केला हिंद श्रीमान् ,
करी हनुमंत त्याचा सन्मान, जी जी

स्वाभिमान् धर्म अभिमान, देश अभिमान, दलित अभिमान,
देशाच्या वेदीवर सारा, पूर्ण बलिदान अर्पिणारा, नेता आमुचा
एक प्यारा, जी जी.

घरदार आणि संसार नाहि पाहिला, जी
मूल बाळ, बायको यांचा लोभ नाहि केला, जी
स्वताहाचा सारा व्यापार देशा अर्पिला, जी

जळजळित देहत्याग केला, तय्यार झाला, देश त्यागाला,
शोभला भारत मातेला, मिळविलं निर्मल कीर्तीला,
धन्य हा सुभाष्चंद्र झाला, जी जी १

गुलामीचा शिक्कामोर्तब, नोकरीचा लाभ, ' जी, जी,
साहेब,' साऱ्या वडिलांचा हट्ट पडला, गेला इंग्लंड्च्या
वारीला, लगोलग आय. सी. एस. झाला, जी जी

परकीय स्वर्ग भुवनांत, काय चैनींत,–राहे लोळत ! बोटीनं
मायदेशिं आला, पाहिलं आपुल्या देशाला, मारिली लाथ
गुलामीला, जी जी

चाळीस कोटिंचा देश लयाला गेला, जी
दारिद्र्य, दुःख, संकट, लोक त्रासला जी
त्याचेंच अन्न अन् वस्त्र, मिळेना त्याला जी

गर्जना केलि देशांत, बोले त्वेषांत, साऱ्या लोकांत, तोडुं परकीय शृंखलेला, करूं या स्वतंत्र देशाला, आंग्ल सत्तेला हादरा बसला, जी जी २

गडबडलं हिंद सरकार, वेडावलं फार, झाली गडबड, उचलिलं सुभाषवीराला, भूषविलं लगे तुरुंगाला, झाली पावन बंदिशाला, जी जी

नायक महात्मा गांधी, अहिंसावादी, जगा जो भेदी, तत्व ना मान्य सुभाषाला, म्हणुन कॉंग्रेस्चा राग झाला, फटकला आपण बाजूला, जी जी

मतभेद जाहला तरी नाहि तो भ्याला, जी
'वळवुंया देश सामर्थ्य' विचार त्यानं केला जी
स्थापिलं 'फॉरवर्ड ब्लॉक' एका संस्थेला, जी

झाली थक्क सारी कॉंग्रेस, नेहरु खास, वल्लभभाईस, साऱ्यानां एक विचार पडला, असा कसा याचा रस्ता चुकला, तेजस्वी हिरा अलग पडला, जी जी ३

भडकला युद्धाचा जाळ, एक्केचाळीस् साल, आमुचा लाल, झाला एकाकी गुप्त स्थाना, जमवि आझाद हिंद सेना, भावि इतिहास गाइ गाना, जी जी

कर्तव्यनिष्ठ हा प्रखर, करी आखेर, एक विचार, 'विजय वा मरण आपणांला, वाहुंया आपुल्या कार्याला,' कीर्तिदेवता वरी त्याला, जी जी

स्वातंत्र्यरणाचा मान मिळविला पहिला, जी
शोभला जगी रणशूर हिंदमातेला, जी
माइलं साऱ्या देशानं त्याच्या नांवाला, जी

संदेश राष्ट्र बंधूनां, भारतीयांना, हिंद तरुणानां, गांठण्या आपुल्या ध्येयाला, पूर्ण स्वातंत्र्य मिळविण्याला, वहा सर्वस्व हिंदभूला, जी जी ४

# नौकरशाहीचें धोरण

लेखनकाल— जून १९४६.

[ ब्रिटिशांच्या तालमींत तयार झालेला निजाम 'फोडा आणि झोडा' या धोरणाविरुद्ध वागून का आपलें वाटोळें करून घेणार ? उलट जातीयतेचा सैतान हाताशींच असल्यानें वरील धोरण सुलभ व्हावें, हें त्याचें भाग्यच. ]

पहा बंधुनों ! तुम्हां सांगतो लाखाची गोष्ट
राग आला तर कुणा येउं द्या, मी करतो स्पष्ट
आपल्या सध्याच्या सरकारी नौकरशाहीनें
ठिवलें धोरण आपली जुलमी सत्ता टिकविणें
युक्ति योजिली त्यांनीं जुलमी सत्ता टिकण्याची
राष्ट्राची शक्ती म्हणजे माणसें फोडण्याची
वेगवेगळें झोडपण्याला आम्हां लोकानां—
सोपें जातें, सत्ता टिकते, माहित हो त्यांना

धर्माच्या अन् जातीच्या आपल्या भांडणाचा
त्यांनीं हा फायदा घेतला आपुल्या बेकीचा
मुसलमान वा महार, मराठा अथवा ब्राह्मण
कुणा चढविती, कुणा उतरिती कांहीं सांगून
अनुभव येतां शाहणा होतो, हेंच खरें असलें
वर्ष दोनशें झाली तरि हे भेद कां न मिटले !
धर्मांतर करतांच कालचा एकजात हिंदू
माणुसकीला होय पारखा कां मुस्लिम बंधू !
धर्म कोणताही असला तरि त्याचा उद्देश–
'प्रेमानें माणूस मेळवा' हा हो संदेश
राष्ट्रत्वाच्या सागरांत या धर्मनद्या साऱ्या
आज ना उद्या राष्ट्राकरितां मिळून जाणाऱ्या
रय्यत सारी एकदिलानें जर का वागेल
हीच आजची नौकरशाही होइल पागल
संस्थानांतिल सारेजण जर इथें एकवटले
कसल्याही जुल्मी सत्तेची होतिल दों शकलें



# चलो दिल्ली –

लेखनकाल–गणेशचतुर्थी १९४६.

[ हिंदुस्थानांतील ब्रिटिश सत्तेला सर्वांत मोठा हादरा बसला असेल तर तो नेताजींच्या आझाद सैन्याकडूनच. साम्राज्यशाहीची हाडें खिळखिळी केली दुसऱ्या महायुद्धानें. भारतांतील ब्रिटिश सत्ता हालविण्यांत इतर महत्त्वाच्या घटना कारणीभूत झाल्या आहेतच पण त्याला नेताजींच्या आझाद सैन्याचा

सशस्त्र उठाव हा अनेक दृष्टींनीं कारणीभूत आहे. इतर घटनांपेक्षांही सैन्यां-तून होणारा राजनिष्ठेचा बदल हा महत्वपूर्ण असतो याची चुणूक १८५७ सालीं इंग्रजानां लागलीच कीं ! ]

( चाल— पोवाडा )

साम्राज्यशाहिचा किल्ला, ज्यानिं फोडिला, एका दणक्याला,
आपुल्या स्वतंत्र भूमीला, तिरंगी झेंडा फडकाविला,
' चलो दिल्ली ' चा घोष केला, जी जी

कोसळूं लागले राज्य, ब्रिटिश साम्राज्य, आहे जे आज,
सिंगापूर किल्ला धडधडला, मलाया हातून पार गेला,
लगोलग ब्रम्हदेश पडला, जी जी

ही अशी वार्ता ऐकून, धडपडे मन, झाले बेभान, वीर बंगाल
जागा झाला, पठाणाचा वेष पूर्ण केला, निसटला सिंह
जाळिमधला, जी जी .

दरकूच करुनि मुक्काम गांठला जर्मनी देश जी
जाहला थक्क हिटलर पाहुनी थोर आवेश जी
'चाळीस कोटिचा नेता धन्य तूं हिंदमातेस ' जी

छावणींत हिंदी सैन्यास, रेडिओ खास, देत संदेश,
हिंदभू स्वतंत्र करण्याला, भारतीय म्हणून जगण्याला, उठा
तुम्हि अखेर मरण्याला, जी जी १

प्रकटलें शौर्य गोऱ्यांचें, ब्रिटिश सैन्याचें, शूर वीरांचें,
जेव्हां का ब्रह्मदेश पडला, लागले धूम पळायाला, गर्दी
त्यांचीच मोटरीला, जी जी

खांद्याला खांदा लावून, देश सोडून, स्वार्थ सोडून,
आपूल्या देशाला होऊन बेमान, हिंदि सैन्यानं दिले हो प्राण,
केलं त्यानां शत्रूच्या स्वाधीन, जी जी

हा सारा विचार करुन आला सुभाष् ब्रह्मदेशाला जी
पाण्यांत कैक हो दिवस राहिला खाली तळाला जी
राखिलं हिंदमातेनं लाडक्या सुभाष् बाळाला जी

प्रकटलें भारतीयवीर, आशियाभर, आले सत्वर, झाली
'आझाद सेना' तय्यार, नेताजी झाला सुभाष् झुंजार,
हिंदभू स्वतंत्र हो करणार, जी जी २

शहानवाज धिलन साहगल, सारे समबल, शत्रुचे काळ,
सेनासारंग एक झाला, तरुण भारत एकवटला, हर्षली
हिंदभूमि बाला, जी जी

'जय गांधी' 'जवाहर जय हो,' 'नेताजी जय हो,'
'लक्ष्मीबाई जय हो,' 'जय हो जय मौलाना आझाद,'
'जय हो इन्किलाब झिंदाबाद' स्फूर्तिनं केला घोष 'जयहिंद' जी जी

तिसऱ्यास हाकून देण्याला ते तिथें जाहले एक जी
आपसांत इथें लढण्याला तिसऱ्यास मारिती हांक जी
गुलामींत दोन्शें वर्षांच्या अक्कल नाही हो येत जी

झांशीची राणी रणधीर, चांदबीबी शूर, तशी झुंजार, मिळाली
येऊन सैन्याला, कॅप्टन् लक्ष्मी नांव तिजला, अमर कीर्तिचा
डंका झडला, जी जी ३

हिंदुस्थान राष्ट्र गुलामांचं, काळ्या आदमीचं, स्वार्थी लोकांचं,
शेळपट लोक काय करणार, दिलं ह्याला उत्तर बाणेदार,
बघा 'आझाद सैन्य' तय्यार, जी जी

व्यापारी आणि कारकून, वेळ बघून, येति धावून, देति सर्वस्व
स्वतःचे प्राण, देश-स्वातंत्र्य हेंच हो ध्यान, बनविण्या स्वतंत्र
हिंदुस्थान, जी जी

पैशाची करतांच मागणी नेताजी जेथें
सोनें, चांदी जवाहिराचे पडति ढीग तेथें
कुणी विचारी ' उत्पन्नांतुनि द्यावा किति हिस्सा ? '
या प्रश्नाला नेताजी पण उत्तर दे खासा
" विचारुंया आपुल्या सैनिकां, ' अहो वीर मरणार !
मरतांना तुम्हि रणागणांवर किती रक्त देणार ?"

स्वातंत्र्य आपलं आपण, आपल्या रक्तानं, आपल्या शक्तीनं,
मिळवुंया वेंचुनि प्राणाला, नको मिंधेपण आपणांला,
स्वाभिमान रोमरोमिं भिनला, जी जी ४

स्वातंत्र्य दिवस चांगला, मुहूर्त पाहिला, पहिल्या हल्ल्याला,
वीर तय्यार सारा झाला, शस्त्र घेऊन सज्ज बनला,
तिरंगी झेंडा आघाडीला, जी जी

शहानवाज सेनासारंग, भारतिय ' जंग ', वीर रणरंग,
करुनि ' जयहिंद ' नेताजीला, निघाला हिंदवीर पहिला,
दिल्लीचा कळस पाहण्याला, जी जी

सरहद्द ब्रह्मदेशाची मणिपूर तिथें संस्थान जी
शहानवाज वीर योद्धयानं शोधिलं तेंच ठिकाण जी
पाहिला खडा सामोर ब्रिटिशांचा हिंदुस्थान जी
पाहिली आई डोळ्यानं हृदयाला चरका बसला
हुंबरुन बोले ' आई आलो मी भेटायाला
शृंखला तोडितो आज नरक हा पुरे गं झाला

दुर्दैवि दोनशें वर्षांत
रक्ताच्या थारोळ्यांत
न्हालीस, परी निश्चित
हें आलों सोडविण्याला
'विजयी व्हा' ऐसे म्हणुनी दे आशिर्वाद आम्हाला,' जी

आठवे सारा इतिहास मागचा त्याला, कैकांची केलि कत्तल दिलें फांशीला, ‘ जालियन्वाला बाग ’ हा डोळ्यापुढं आला, मेड्याचा नाद कानांत घुमे खळखळां, डोळ्यांत उतरले रक्त वीर भडकला, गर्जला घोष गंभीर, एक ‘ जयहिंद ’ चढविला हल्ला जी जी ५

आठराशे सत्तावन नतर, हेच संगर, भारतीय वीर, पाश परकीय तोडण्याला, पुन्हा स्वातंत्र्य मिळविण्याला, भिडला ब्रिटिशांच्या संगिनीला, जी जी

रणगाड्या भिडति रणगाडे, तोफ धडधडे, वीर हो खडे, सारखे उभे सामन्याला, फिरे झाडींत मुक्काम पडला, विसरला स्वत: आपणांला, जी जी

कधिं उपाशि कधिं खायाला तीन दिवसाला जी
शत्रुच्या परी रक्तानं उभा नाहला जी
स्वातंत्र्य हीच देवता धीर दे त्याला जी

मार्चच्या आठरा तारखेला, हिंदवीराला, भाग्यकाल आला, भाग इंफाल हातीं आला, मिळाला विजय भारताला, फडकिलें राष्ट्रनिशाणाला, जी जी ६

भारताचे अमर सरकार, कीर्तिचे थोर, गाजे जगभर, झाले स्थापन त्याचवेळां, मोठ्या राष्ट्रांनी मान दिधला, नेताजी मुख्य त्यांचा झाला, जी जी

निवडून अष्टप्रधान, नेताजी यानं, केला सुरू सन, कारभार स्वतंत्र देशाचा, नाण्यावर शिक्का भारताचा, महात्मा गांधी नेहरूंचा, जी जी

बदलून गुलामी शिक्षण काढल्या आपल्या शाळा जी
बनविण्या हिंद बलवान बदलला नकाशा सारा जी
चाळीस कोटिच्या साठीं नेताजी योजि बेताला जी

कीर्तिचा गंध पसरला, झाला बोल्बाला, आप्ल्या नेत्याला,
नेताजी धाडि स्फूर्ति–संदेश, देतो स्वातंत्र्य–सनद मी खास,
वाहण्या गांधींच्या चरणांस, जी जी ७

पंचेचाळीस साल हे नष्ट, सोळा ऑगस्ट, जपान हो भ्रष्ट,
पराभव त्याचा पूर्ण झाला, मिळेना शस्त्र सामुग्रीला, म्हणूनच
नाइलाज झाला जी जी

जातांच जपान शरण, नेताजी यानं, दिला हुकूम,
'बंधुनों ! शस्त्र ठेवा खाली, जपा पण शक्ति स्फूर्ति आपुली,
आईची भेट लांब गेली' जी जी

ऐकून हुकुम नेत्याचा घातल्या खालती माना जी
'सूड, सूड,' या शब्दानं घेरलं होतं हो त्यानां जी
'मातृभूमि करितां आमुच्या बलिदान करूं द्या आम्हा' जी

ऐकून शब्द हो त्यांचे, हृदय नेत्याचें, भरून ये साचे,
'सेवा कॉंग्रेस्ची करण्याला, तिथें जा स्वतंत्र होण्याला,
ठेवला पाय विमानाला, जी जी ८

साम्राज्यशाहि [illegible]पुली, ठेवण्या भली, दिले हो बळी,
आजवर पर[illegible]ाला, कांचेचा फुगा आज फुटला,
सुभाष् वीरा[illegible] त्याला, जी जी

गर्जना लोकशाहिची, विश्वभावाची, उच्च तत्वांची,
पूर्ण स्वातंत्र्य पुन्हां मिळणार, अगोदर मात्र आम्ही मरणार,
हिंदुस्थान आतां नाहि फसणार, जी जी

आझादहिंद ते सारे राष्ट्रीय सभेचे वीर जी
येतील उद्यां नेताजी हृदयाचे आमुच्या प्यार जी
ऐंशि कोटि आमुचे हात स्वागतास हे तय्यार जी

भुलाभाईच्या शब्दांत, मांडतो स्पष्ट, आज ही गोष्ट,
देशस्वातंत्र्य मिळविण्याला, हक्क आपुला असे पहिला,
कवी हनुमंत गाई याला, जी जी ९



# शांतता.

लेखनकाल :– ऑगस्ट १९४६.

[ सुराज्य म्हणजे स्वराज्य नव्हे. नागरिक स्वातंत्र्याच्या व्दारें मानवी विकासाचे एकंदर मार्ग मोकळे होणें ही केवळ सुराज्यानें साधणारी वस्तु नव्हें. त्याला खरें खुरें संपूर्ण राजकीय स्वातंत्र्यच हवें. ]

( चाल– नभि हंसालि चांद्रिका )

जगिं भरलि हीच का, शांतता ?
लाभे ना अजुनि जी आम्हांला ॥
पारतंत्र्य—भेसूर—शृंखला
दास्य कधीं हांसवी कुणाला ?
सुवर्णपंजरिं पिक कां रमला ?
कां न आमुची योग्यता ?



# काला बजार

लेखनकाल– ऑगष्ट १९४६.

[ तोंडानं देशभक्तीच्या गप्पा व हातानें मात्र विशुद्ध देशद्रोह ही ' असुरी फॅशन् ' आज आपल्या देशांत तरी सर्रास रुढ आहे. जोपर्यंत प्रत्यक्ष जनतेनेंच आपल्या गरजा शक्य तितक्या कमी करुन कंबर कसल्या खेरीज निदान आज तरी प्रत्यक्ष ईश्वर ( जर असेल तर ) सुद्धां या देशव्यापी संकटाचें निवारण करूं शकेल की नाहीं, शंकाच आहे. ]

— गझल —

गरीबोंकी हाल्त सुधार रहे
भारत् में सारा उजाला रहे ।

बदला हुवा है रंग जमानेका आजकल्
जिंदे हैं अभी लोग, मगर पड गइ मुष्कल्
खानेसे गरीबोंकी तो हालत् बिगड गई
गडबडमें लपूटोंकी तो रंगत ही खुल गई

जब हो गया शुरु ये लढाईका जमाना
यूरप् में हुवा होगा जो होना था सो होना
वो लड्ने वालों का तो मूंह गोरा ही रह गया
ये मुल्क का बजार तो काला ही हो गया

इसवास्ते सरकारने कानून् बना दिये
रुषवत् नें मगर सब् के सब् बरबाद कर दिये
आखर जो मरने वाले थे मरने लगे इधर
शक्कर की बडी शानसे } बिल्डिंग खडी उधर.
चांवल की बडी शानसे }

पहले जो लखपती थे वो करडोपती बने
दस् पांच हजारवाले थे वो लखपती बने
घबरा गये हैं दिल्में ये पूंजीपती मगर
नोटें ये कहीं जब्त होगी, लग् गई फिकर

# जगाची शांतता.

लेखनकाल. ऑगस्ट १९४५

[ आपलें घर आपणास प्रिय असतें त्याच वेळीं आपला देश ही आपणांस तितकाच प्रिय असतो. किंबहुना प्रसंगविशेषी देशाकरितां घराचा त्याग करावा लागतो, हाच न्याय जगाला का लागू असू नये ? मानवजात ज्या दिवशीं देशाप्रमाणेंच साऱ्या जगाचें नागरिकत्व पत्करण्यास स्वयंस्फूर्तीनें सिद्ध होईल त्याच वेळीं शस्त्रास्त्रांची अवश्यकता नाहीशी होऊन जगांत खरी शांतता नांदेल. नेमकी हीच गोष्ट जगद्वंद्य म. गांधींनी जगापुढें ठेवली. तरवारीनें तरवार कायमची शमेल का ? नाही. तर प्रेमानेंच ही गोष्ट –जागतिक शांतता–शक्य आहे. आज आपले पंतप्रधान, महात्माजींचे वारसदार, जगांतलि थोर मुत्सद्यांनी सुध्दा 'जगाचे नागरिक' म्हणून ज्यांचा मोठ्या गौरवानें उल्लेख केला ते आपले लोकसम्राट पं. जवाहरलाल नेहरु देखील हेंच नाही का सांगत? आणि म्हणूनच आपण अभिमानानें म्हणू शकतों कीं अशोक चक्रांकित तिरंगी ध्वजाखालीं भारत जगाला हाच संदेश देत आहे. ]

( चाल– तूं कोनसे बदलेमें मेरे )

देवांत कुणी देव असा का कधिं झाला ?
अग्निनेंच अग्नि महा शातचि केला ?

जग शांत बसे कां कधिं खड्गास भिवोनी ?
शिकवि धडा, भारत पहा, शांति जगाला



# जयभारत माउली.

लेखनकाल ऑगस्ट १९४६ .

[आजच्या मुलांप्रमाणेंच मुलींही राष्ट्राची शक्ति व संपत्ती आहे. पूर्वींच्या व आजच्या भारतीय महिलांनी त्यांच्याकरितां आपला वारसा व आरसा ठेवलेलाच आहे. याच भावनेची प्रेरणा खालील गिताचे व्दारें व्यक्त होत नाहीं काय? ]

( चाल– येउनि जा त्रिगि त्रिगी )

काय करुं आम्ही मुली ।
हंसत जाउत लढण्याला
राज्य आमुचें घेण्याला
जिंकुत दिल्ली,
हेंच करुं आम्ही मुली ॥

होऊं आम्ही कोणि ' सरोजिनि '
' विजयालक्ष्मी ' कोणि बनोनीं
' अरुणादेवी ' कुणी, सानुली
हेंच करुं ०

हिंद हा आमुचा,
स्वतंत्र करुं मंडित
सम्राट आमुचे
' जवाहीर पंडित '

मग मिळून करुं गर्जना,
करुं घोषणा
' जय भारत माऊली '
हेंच करुं ०

# – जबाबदार राज्यपद्धति –

लेखनकाल:—जून १९४६

( कधीं काळीं व कशीतरी मिळालेली अगणित संपत्ती वारसा हक्कानें उपभोगणारा सुखलोलुप जमीनदार, इनामदार व अनिर्बंधपणें पण कशाही मार्गानें केवळ पैशावर पैसा मिळवून गजगंड संपत्तींत लोळणारा भांडवलदार हे सारे स्वातंत्र्यांत बहुजन समाजाकरितां–जनतेचें राहणीचें मान वाढून सुस्थिर होण्याकरितां होऊं घातलेल्या बदलामुळें मनांतून खूष असतील असें मानणें म्हणजे इतिहासाचें अज्ञान होय. आणि म्हणूनच स्वातंत्र्याची अवश्यकता, आज पावेतों पिळला गेलेला बहुजनसमाज व याच परिस्थितीचे सतत तडाखे खाणारा पांढरपेशा मध्यमवर्ग यांनाच आहे. खालील पोवाड्याचें चित्रण निजामी कारभाराचें असले तरी थोड्या फार फरकानें बहुजन समाजाच्या याच अपेक्षा नाहीत का ? असे नसेल तर आजच्या लोकशाहीच्या काळांत स्वातंत्र्याला अर्थ तरी काय ? )

– पोवाडा –

आपल्या हिंददेशांत, आर्यावर्तांत, भरत खंडांत, एक
श्रीरामराय झाला, असुन राजा तो देव बनला,
ज्याचा हो अजुनि बोलबाला, जी जी

तसे झाले अशोक नरवर, आणि अकबर, सौख्य देणार, देशाचे
खरे राजे झाले, रयतेच्या सुखामधी रमले, म्हणुन आमच्या
मनीं ठसले, जी जी

त्यांनीं केला एक कारभार शांति सौख्याचा जी
रयतेचं सौख्य पाहून भरे दिल त्याचा जी
आईनं समाचार घ्यावा आपल्या लेकराचा जी

राजाचा देव कसा झाला, विचार नाहि केला, सांगतो
तुम्हाला, तीनशें वर्षांचा काळ गेला, इंग्रज इथं नव्हता
आला, कसा वागला राजा आपुला, जी जी

होता राजा आपल्या मुल्खाला, विचार त्यानं केला,
पुसुन साऱ्याला, चावडी हरएक खेड्याला, पांड्या पाटील
राखण ठिवला, पंच कारभार सुरू केला, जी जी

पंचांनी बसाव चांवडींत, न्याय निवडीत, गांव हो शांत,
हिसाब ठेवावा पांड्यांनं, गस्त घालावी पाटलानं, गावाचं
करावं रक्षण, जी जी

गांवाला असे गावकोस, वेस हो भारी जी
वेसकरी तिथं रात्रीचा असे कारभारी जी
असे होते गांव राखणारे, खरे गांवकरी जी

ग्रामराज्य टाकलं बुडवून, राजे लोकानं, विचार करून,
खेड्यामधि गोंधळ माजविला, खेड्याचा मुखी लोक
अमला, शेतकरी गुलाम करून ठिवला, जी जी २

बदलली दुनिया ही सारी, राज्य कारभारी, आमुचे वैरी,
तहसीलदार तालुकदार आला, तसा बघा पोलीसांचा
मामला, नौकर शाहिचा जुलुम झाला, जी जी

हे सारे हुकूमाचे बंदे, अकलेचे कांदे, म्हण पोशिंदे (?)
शेताला कधीं नाहि गेला, खुर्चिवर बसून कायदा केला,
'शेतकऱ्यानं द्यावं लेव्हीला', जी जी

आम्ही पगार देतों याना नौकरी मात्र सरकारी
खाऊन आमुचें अन्न हा जुलूम आमच्यावरी
हे 'दलाल' सरकाराचे साभाळणार नौकरी

खाऊन आमची पोळी, इतरांची टाळी, हेंच कां भाळीं ?
काम हे नौकरशाहीला, दुसरं काम सुचत नाही याला,
ठिवलं याला रयत झोडपायला, जी जी ३

राजांचं राजेपण गेलं, आयुष्य संपलं, कशानं असं झालं,
सत्तेची धुंदि चढली त्याला, निर्मिलं नौकरशाहीला,
रयतेच्या उरावर नाचायला, जी जी

निकरानं करतो वसूल, जमीन महसूल, होतो सालोसाल,
म्हणतो 'मी सारा जिम्मेदार, रयतेला छान पोसणार,'
रयत तर फिरे दारोदार, जी जी

ही रेल आमुच्या पैक्याची पायानं जावं जत्रेला
दुप्पट दाम देऊन मोटार नाहि वेळेला
दवाखाना आमुच्या पैशाचा औषध मात्र दुसऱ्याला

खर्चून आमुचे पैसे काढल्या शाळा जी
कागद नाहि वाचायला येत आम्हांला जी
कुणि यावं कुणी तुडवावं, जन्म चालला जी

पिकवून धान्य शेतांत, नाहि पोटांत, त्यांच्या हातांत,
द्यावं नेऊन सारं त्याला, लागलं कुलूप कोठ्याला
कोठ्यादेखत प्राण गेला, जी जी ४

किती खावं, काय आम्ही खाव, किती लेवावं, काय बोलावं,
ठेवलं त्यानं आपल्या हातांत, 'लोकांनों, वागा आमुच्या
कायद्यांत, नाहितर बसा जेलखान्यात जी जी

आमुच्या सत्तेच्या घरीं झालों आम्हीं चोर जी
खाऊन थंड बसावं बुक्याचा मार जी
याचं नाव 'राजाची सत्ता' बघा कारभार जी

रयतेनं मागितलं खायाला, देतो जबाबाला. गरीब रयतेला,
'माती खा पोट भरायाला, कांटेकुटे भरावे पोटाला,'
राजा असा कसा टिकंल बोला जी जी ५

असं नाहीं इंग्लंड देशांत, लोक चैनीत, अशा दिवसांत,
तिथं आहे पंच कारभार, त्या ठिकाणीं असं झालं तर,
नरडिचा घोंटच घेणार, जी जी

तिथं आहे राज्य पंचांचं, पंच लोकांचं, साऱ्या रयतेचं, पंच
जर बेवकूब ठरला, हाकलुन द्यावं कोणि त्याला, सत्ता
ही आहे लोकांला, जी जी

स्टेट कॉंग्रेस् आतां आपुली, मिळविणार या सत्तेला
सत्तेचा धनी तो एक कष्टानं जगवि देशाला
याचं नांव ' जबाबदार राज्य, ' शेतकऱ्याचा, ' जय जय ' बोला

हा देश आमुचा, मालक आम्ही देशाचे जी
आमुचें राज्य करणार पंच आमुचे जी
आमुचे जबाबदार आम्ही, हेच न्यायाचें, जी

लोकशाही नांदो जगतांत, हिंद देशांत, निजाम राज्यांत,
खरी निर्मळ लोकशाही, विश्वबंधुत्व संस्कृती ही, कवी
हनुमंत देत ग्वाही, जी जी . ६



*

# गरीबांचा झेंडा

लेखनकाल. ऑगस्ट १९४६

[ काळाच्या सत्यस्वरूपाचें प्रत्यक्ष दर्शन झालें असतांना सुद्धां पारंपारिक घटनेला चिकटून राहण्याचा प्रयत्न करणें हा भांडवलशाहीचा मूर्खपणाच नव्हे तर आज देशहिताच्या दृष्टीनें अक्षम्य अपराध आहे. याचा शेवट कशांत होणार याची त्यानां जितकी लवकर जाणीव होईल तितकें बरें. ]

( चाल—नदी किनारे )

चला सख्यानों ! चला गड्यानों !
चला आघाडीं हो ।

गरिबांच्या झोंपड्या जाळुनी
महाल केला श्रीमंतांनी
त्या महालावर हा गरिबांचा
झेंडा लावूं हो ।

गरीब मरती यांच्यासाठीं
कधीं रहाती उपाशि पोटीं
मोटारींतुन उतरायाला
त्यांना सांगूं हो !

# स्वातंत्र्य लक्ष्मी.

लेखनकालः- सप्टेंबर १९४६.

[अनेक वर्षांच्या गुलामगिरींत मुरलेल्या रक्ताला स्वातंत्र्याची ओळख ताबडतोब न पटणें यांत आश्चर्य काय? शेळ्यामेंढ्यांत वाढलेल्या सिंहाच्या छाव्याला त्याच्या आस्तित्वाची ओळख दुसऱ्या सिंहानें करून द्यावी लागते. तव्दतच २ सप्टेंबरला मध्यवर्ति सत्ता हातीं आली व पुढें ( हे गीत लिहिल्यानंतर) १५ ऑगस्ट १९४७ ला प्रत्यक्ष स्वातंत्र्यलक्ष्मीचें दर्शन झालें तरी तिच्या आस्तित्वाची कल्पना महात्माजींनीं करुन द्यावी लागली. ]

( चाल- लबाड तूं )

उदास कां ! उदास कां !
चल रे ऊठ ना !

तुझ्या मनाला, हंसवायाला
हंसत उषा आलि ना !

तुझीच ती करुणा,
पाहिली, वाट किती राजसा

जिवाशिवाचे
बहुमोलाचे

प्राण अर्पिले ना !
तीच ही स्वातंत्र्यलक्ष्मि ना !



# लाल किल्ला.

लेखनकाल :– एप्रिल १९४६.

[ "कालाय तस्मै नम." आज भारताच्या पुनर्वैभवाने तळपणारा, ज्याच्या दरवाजावर साऱ्या जगाला मानव्याचा संदेश देणारा भारताचा महान् तिरंगी ध्वज डौलानें फडफडत आहे, त्या लाल किल्ल्यांत एकेकाळीं आम्हांलाच गुन्हेगार म्हणून उभें रहावें लागलें. ज्या मोंगल सम्राटानें तो किल्ला बांधला, ज्या किल्ल्यांत बसून बादशहा जगांतील अनेक देशांच्या प्रतिनिधींचे मुजरे घेई त्याच किल्ल्यांत त्याच्याच वंशजाला हद्दपारीची शिक्षा व्हावी ! विकराळ काळाच्या तडाख्यांत सांपडून ज्यानें जन्मापासून आतांपर्यंत अनेक बरीवाईट स्थित्यंतरें पाहिली तोच हा आपला लाल किल्ला. ]

इतिहास पहा आज तीन शतकांचा
आखंड हिंद राज्याचा

साम्राज्य इथें किती नांदले भारी
बावरली दुनिया सारी

आभंग असा भारत तेव्हां झाला
अजुनि ही वस्त्र तें त्याला

तो 'जहांगीर' सम्राट
'शहाजहान' गाती भाट
बनविला स्वर्गीचा थाट,

आभूषण जो हिंददेविचा बनला
दिल्लिचा लाल तो किल्ला ॥ १ ॥

किती वर्णू मी किल्ल्याचा इतिहास
कुंठते लेखणी खास

सम्राटाचे मयूर सिंहासन ते
जडितांनी जे चमचमते

सिंहासनिं त्या जेविं बसे सम्राट
'कोहिनूर' तळपवि मुकुट

किल्ल्यांत दिल्लिदरबार
शोभती हिंद नरवीर
बाहेर दरारा फार

विजयाचें या चिन्ह आज ही ठरला
दिल्लिचा लाल तो किल्ला ॥ २ ॥

जे भेदरले, आज आम्हां भेडविती
तुम्हि 'गुलाम' म्हणुनी हंसती

हा काळ कधीं मित्र असे कोणाचा ?
आज ना उद्यां तो आमुचा

या काळानें गिळिले विजयी वीर
लहानांचे केले थोर

गाजतें आज साम्राज्य
इवलेंसें इंग्रज राज्य
जेत्याची धुंदी आज

तो इंग्रज ही नम्रपणें ज्या नमला
दिल्लिचा लाल तो किल्ला ॥ ३ ॥

किति दूर बसे इंग्रज त्या दरबारीं
ऐकतसे दुनिया सारी

किति वाके तो, हात लावि जमिनीला
करि मुजरा बादशहाला

किति आशेनें दृष्टि लावि सामोर
लागलीच पलटे नूर

दुर्दैव ! उलटला फांसा
तो इंग्रज घे उश्वासा
पळविला 'बहादुर' खासा

वेंचिले तिथें मोति एक काळाला
दिल्लिचा लाल तो किल्ला ॥४॥

सिंहासनिं त्या आज बैसला कोण ?
पूर्विचा फिरंगी दीन

ठाकले उभे गुन्हेगार सामोर
राज्याचे वारसदार

जे चंद्राच्या प्रभावळींतिल तारे
कायमचे लखलखणारे

शहानवाज धिलन् रणसिंह
उजळलें साहगलनिं नांव
घेतला कीर्तिचा ठाव

जनकास गुन्हेगार पाहण्यां धजला
दिल्लिचा लाल तो किल्ला ॥ ५ ॥

हे सुधारले जग शेखी मिरवीते
मानवतेचा जय गाते

गर्जले आधी ' लोकशाहि, स्वातंत्र्य '
जगतास दिला हा मंत्र

ध्येय तेंच ते धरुन लढले वीर
' आझाद सैन्य ' हे शूर

त्या दोस्तांच्या शब्दातें
जागले आमुचे नेते
मिळविण्यास स्वातंत्र्यातें

मग न्यायाची रंगभूमि कां सजला ?
दिल्लिचा लाल तो किल्ला ॥ ६ ॥



# हिंदी.

लेखनकालः– १७–३–४२ ( राजस्थान विद्यालय. )

[ गुलामगिरींतील परिस्थितीनें देशाच्या प्रगतीस खीळ घालणाऱ्या कुटीर वृत्तीनें आम्ही भारलो होतों पण या पुढें एकराष्ट्रियत्व आपल्या रोमरोमांत भिनलें पाहिजे. बाहेरच्या जगांत हिंदू म्हणून नव्हे तर हिंदी म्हणूनच आपण आपली ओळख दिली पाहिजे. ]

या हिंद माउलीचा
मी पुत्र एक हिंदी
हिंदू असो कुणी ही
मी मात्र एक हिंदी ।

सजवावया घराला
धुंडोनि देश सारा
गुंफेन एक माला
ती तोरणें सुगंधी ।

फडकीन आंगणांत
झेंडा समानतेचा
विश्वांत तेज पसरे
त्या मी ध्वजास बंदी

घेवोनि एक हातीं
गीतांजली पवित्र
संदेश दे जगाला
हो मानवा आनंदी



# एक बनें.

लेखनकालः—ऑगस्ट १९४६.

[ त्याच भारत मातेच्या उदरांत जन्मलेलीं पण भिन्न संकृतीला चिकटून पर्यायानें मानवतेचा खून पाडण्यास सिद्ध झालेली लेकरें आपला हटवाद टाकून, रुढीनें बरबटलेलीं कृत्रिम बंधनें तोडून, केवळ माणुसकीनें एकमेकांच्या जवळ येतील तोच भारताच्या एकराष्ट्रीय संस्कृतीचा भाग्यकाल. ]

हम सब एक बनें
भारतमाता के मंदिर में ।
मंदिर हो, यह मसजिद हो
यह पवित्र गुरुद्वारा
वेद पढे, कोई कुराण,
सब है भारतका प्यारा
दो दिनका यह रक्तदान है
मिट जाये सारा
एक शब्दसे बोल उठेगा
' जय भारत ' नारा !



# जनता—संग्राम.

लेखनकालः— एप्रील १९४९.

[ राजकारणाचे काय खांच खळगे असतील ते मुत्सद्दीच जाणें. सर्वसाधारण मानवी नियमच असा आहे कीं मूल संकटाच्या वेळीं आपल्या आईलाच बिलगेल. केवळ याच न्यायानें हैद्राबाद स्टेट कॉंग्रेस आत्यंतिक संक-

टाच्या वेळीं १५ ऑगस्टला स्वतंत्र झालेल्या आपल्या मातेच्या कुशींत शिरली. तिचा आसरा घेतला. यांत अनैसर्गिक तें काय? टीकाकार मित्र कांहीही म्हणोत. शक्यतेच्या पलीकडील सुवर्णसंधी हैद्राबादच्या या संघटनेला लाभली, तिचा तिनें फायदा घेतला यांत बिघडलें कुणाचें? भारत परतंत्र असतांना इतरांइतकाच– नव्हे–बरोबरीनें हैद्राबादच्या जनतेनें तनमन-धनानें त्याग केला, रझाकारी घटोत्कच तितक्यांच धडाडीनें अंगावर घेतला, पोलीस ॲक्शन पर्यंत अनेक हुतात्म्यांनीं आपलें बलिदान दिलें, त्याच जनतेनें आपली आई दिसतांच–देश स्वतंत्र होतांच–तिचा आश्रय घेऊं नये व त्या सहवासानें मिळणाऱ्या चैतन्याचा उपयोग शत्रूला हतबल करण्याकडे करुं नये हा कुठला न्याय? केवळ मदांध जातीयतेला तोंड देण्याकरितां है. स्टे. कॉंग्रेसनें सरहद्दीवर चहूंबाजूनीं किसानदलें स्थापन केलीं व त्या दलांनी आंत शिरून जनतेवरील रझाकारांचे अन्याय, लूटमार, यानां तुटपुंज्या साहित्यानिशीं तोंड दिलें. ठिकठिकाणी आधुनिक शस्त्रसामुग्रीनें सज्ज अशां निजामी लष्कर, पोलीस व गुंडानां कधीं कधीं तर मोकळ्या हातानें शह देऊन जनतेला धैर्यवान् बनविण्याचा यशस्वी प्रयत्न केला. आणि शेवटीं जातीयवादानें धुंद होऊन जातीय सत्तेचें राजकारण खेळूं पाहणाऱ्या कांहीं थोड्या मगरमस्तांना वगळून बाकीच्या हिंदू मुसलमान साऱ्या जनतेंत हिंदी सैन्याचें आकंठ स्वागत करण्याची प्रबल आतुरता निर्माण केली व हे सारे करीत असतांना खर्चाच्या आंकड्यांची बेरीज किती आली हा हिशेब हैद्राबादच्या भावी इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिलेला असेल, हीच अपेक्षा. )

( पोवाडा )

स्वातंत्र्य आलं देशाला, पंध्रा ऑगस्टला, भरत खंडाला,
नेहरुंचा सुरूं झाला कारभार, झाला मालक (!) समंदर-
पार, रडूं लागले राजे, सरदार, जी जी,

कितिकांनीं शोक आवरला, काळ वळखला, आपल्या पग-
डिला, वाहिलं वल्लभ चरणाला, वळखिलं खऱ्या वल्लभाला,
अशोक्चक्राला मुज्रा केला, जी जी

नाहि पटलं आमुच्या साहेबाला, विकलं अकलेला, पेटला
हट्टाला सत्तावन साल वाटलं त्याला, भाळला गोय्या कात.
डीला, हिंदि लोकांचा शत्रु बनला, जी जी

सम्राट म्हणे स्वताहाला, ठावं होतं त्याला, राजा नांवाला,
उरला कुठं कपाळीं लावायला, लागला नशीब पारखायला,
लोकांचा अंदाज नाहि कळला, जी जी

गुलामीचा काळ संपला दोनूशें वर्षांचा जी
देशांत वारा संचरला लोकराज्याचा जी
तिथं मुद्दा राहिल् का लोक हैद्राबादेचा ! जी

काँग्रेस्च्या निशाणाखालीं, स्वामीनीं भली, दिली आरोळी,
गर्रकन् लोक झाला गोळा, दिलं आव्हान निजामाला,
'निजामा ! मिसळ भारताला,' जी जी १

सात ऑगस्ट या दिवसाला, सत्तेचाळीसाला, पूज्य स्वामिला,
लोकनेत्याला नेलं पकडून, डांबलं तुरुंगांत नेऊन, सारी
मग प्रजा गेलि बिथरुन, जी जी

हजारोनीं चालले गर्जत, राष्ट्राचे भक्त, बंदिखान्यांत, म्हणत
'स्टेट काँग्रेस् झिंदाबाद, हैद्राबाद पुन्हा करूं आबाद,
जुल्मि सत्तेला करूं बरबाद,' जी जी

काँग्रेस्चा किसान तो वीर, होता रणधीर, नव्हता मजूर,
खरा तो पूत भारताचा, शिपाई आपल्या काँग्रेस्चा,
शोभला सेवक जनतेचा, जी जी

कोल्हाळ बघून निजामाचं उठ्लं मस्तक जी
सामर्थ्य बघून कैकांचं फाटलं खिस्तक जी
बावचळून सोडले रयतेवरी हस्तक जी

कंसानं जसं कृष्णाला, तसं कॉंग्रेस्ला, ठार मारायला, दैत्य
अन् हत्ती पाठविले, डाव सारेच परी हुकले, अत्या-
चारीच पाल्थे पडले, जी जी १

झाली हद्द अत्याचारांची, रझाकारांची, त्यांच्या रझवीची,
त्यांनि नाहि कांहीं बाकि ठिव्लं, करायचं होतं तेव्ढं केलं,
मुसल्मान गरीब फसवीलं, जी जी

धर्माच्या नांवाखाली, घेत्ले किति बळी, सतींची होळी,
आतां कॉंग्रेस्ला विचार पडला, लढा जर असाच चाल-
विला, संधि ही जातियवाद्यांला, जी जी

फावेल आयतं निजामाचं, धोरणच त्याचं, लढा मारण्याचं,
स्टेट कॉंग्रेसनं रंग बळखून, पडले बाहेर कांहीं त्यातून,
हद्दीवर बसले पाय रोवून, जी जी

| | |
|---|---|
| 'माणीकचंद' सेनानी | मनमाड कॅंप चालविला |
| नगरला 'रतन', वाशिमला- | योजिलें- 'विनायक' याला |
| 'भगवान' उमरखेड्यास | 'नरसिंग' धरी चांद्याला |
| ते 'राम' अन् 'हयग्रीव' | स्फूर्तीच विजयवाड्याला |
| तो 'फुल्लारड्डि' कर्नुलला | गदगला 'देसाई' बसला |
| तो विजापुरीं 'मल्लपा' | 'फूलचंद' सोलापुरला |

योजना आंखली शिस्त त्यांत राखाला जी
तो 'मराठवाडा' खरी स्फूर्ति सैन्याला जी
ते पूज्य बाबासाहेब सारं पुरवायला जी
म्हणुन् पथक् शोभलं 'परांजपे' नांवाला जी

ते बिंदु सेनासारंभ, कामामधिं दंग, बांधिला चंग, राष्ट्राची
सेवा ध्येय महान्, ज्यांनि नरवीर केले निर्माण, शिपाई
मानि ज्यांचं फर्मान, जी जी २

सारा किसान् झाला तय्यार, पडे बाहेर, हातावर शीर, आज काय् पड्ला अमूका नाका, जुल्मि सत्तेला कुठें धोका, साधती रोज असा मोका, जी जी

शेंकडो मैल हे आंत, त्यांच्या दाढेंत, हात घालीत, रोज एक्दोन पाडिती दांत, झाली धांवपळ रझाकारांत, रझ-विला पडलि खरी हो भ्रांत जी जी

मोठमोठे अड्डे हा त्यांचे, रझाकारांचे, म्हणजे सत्तेचे, कुठं हद्गांव कुठं कल्याळ, रझाकार होती रानोमाळ, गोळ्यानं होती रक्तबंबाळ, जी जी

खंबरि किल्ले सत्तेचे, जिथं शस्त्राचे, तोफखान्याचे, होते भरलेले दारु कोठार, बेधडक् किसान् वीर शिरणार, दिले उडवून कैक हो बार, जी जी

हा किसान् छातिचा शूर, देशाचा प्यार, फक्त लढणार साधी बंदूक मिळे त्याला, नुसत्या लाठीनं कधीं लढला, हिंददेवता स्फूर्ति त्याला, जी जी

अपसिंग तशी ब्राह्मणी, लढविली रणीं, चिलवडी कुणी, शेंकडो खेडी मुक्त केली, तिथं कॉंग्रेस्ची सत्ता आली, लोकानां आई भेटवीली, जी जी

हा सिंहगड चढतानां तानाजी कितीतरि झाले
देशास वाहिलें शरिर रक्तानं नांव छापियलें
अधिर, बहीर्जी आणि नाईक पिढिचे ठरले
ते आले, गेले, मेले हृदयांत चिरंजिव झाले

गाईल पुढें इतिहास, स्टेट कॉंग्रेस, रामानंदांस, आणि या किसान् बहाद्दरांला, उजाळिलें ज्यानीं कॉंग्रेस्ला, मानिलें एक भारताला, जी जी ४

स्वातंत्र्य हैद्राबादेचं, नाहि फुकटचं, यांच्या रक्ताचं,
कितीतरि वीर आणि महिला, जाहले शहीद कार्याला,
गांठण्या आपल्या ध्येयाला, जी जी

रक्तानं एक भारत, त्याच्या पोटांत, रोग वाढत, स्टेट कॉंग्रेस्‌ची
स्फूर्ति घेऊन, किसान हे सारे एक होऊन, झगडले शीर
हातीं घेऊन, जी जी जी

कॉंग्रेस्‌चा किसान भारला, लोक राज्याला गरीब राज्याला,
कष्ट करणार तोच खाणार, ऐत गब्बूनां डच्चु मिळणार,
देशाची पूर्ण वाढ करणार, जी जी

स्वामिजी तसे जवाहिर, तसे सरदार, किसान् कामगार,
या पुढें सारे एक ठरणार, देश हा नवीन घडवीणार, त्यांत
सर्वांची सोय होणार, जी जी

हा गरीब हा श्रीमंत भेद ना आतां जी
कष्ट ही खरी दौलत, देशाची मत्ता जी
होईल आतां यापुढें मानवी सत्ता जी

गांधींचा अमर संदेश, साऱ्या देशास, देशभक्तांस, नको
वर्चस्व आपसांत, सारे समसमान देशांत, प्रेमानं
वागा सर्वांत, जी जी



# राजे लोकांनों !-

लेखनकाल:—गणेशचतुर्थी १९४५.

( भारतांतील संस्थानिकांचे इतिहास म्हणजे पुढच्या काळांत ' अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी ' च ठरतील.

प्रकृतीनें नष्ट होतांच कालचें त्या विषयाचे गांभीर्य आज कमी झालें व भविष्यकाळीं तर तो एक विनोदी वाङमयाचा प्रकारच होऊन राहील. अनेक राजे महाराजांच्या अनेकरंगी पुंष्पगुंफा गुंफिलेल्या आहेत. तेव्हां त्यांचें खालील चरित्र, हे भावी इतिहासाला पूरकच नाही कां ? मात्र अनेक शतकें पावेतों जनता– त्यांच्या कारकीर्दीत होरपळलेली जनता- आपल्या पाठीवरील आसुडांचे वळ पाहून झोपेंत देखील तेंच बोलत उठेल. माझ्यासारख्या क्षुद्र कवीची लेखणी त्यांचे–आज क्षितिजापलीकडे असलेल्या राजे महाराजांचे गुणगान करण्यास असमर्थ आहे.

देशी राज्य प्रजापरिषदेच्या व्यासपीठावरून पंडितजींनीं केलेलें भाषण प्रस्तुत कविता लिहितांना लेखकाच्या डोळ्यासमोर होतें. )

आखंड भारताचा
  संस्थानच्या प्रजेचा
स्वातंत्र्य संगराचा
  सेनापती जवाहिर
गर्जे खड्या सुरानें
  राजे महाशयानों !
बेबंदशाहि सोडा
  ह्या लोकशाहि जाहिर
हा काळ ओळखा हो
  मानोनि लोक–सत्ता
विश्वास घ्या प्रजेचा
  नांदले ना सुबत्ता!

लाठीप्रहार साधा
  बंदूक आणि संगीन्
झाली निराश जेथें
  विक्राळ ती मशीन्‌गन्
केला प्रयत्न राहण्या
  तल्वारिच्या बळानें
साम्राज्यशाहि जेथें
  ती चालली सुखानें
 हा काळ ओळखा हो ०

जगिंच्या शिकंदराला
  क्षमणार कोणि नाही
असला जरी प्रतापी
  निस्वार्थि तोहि नाही
उपभोग जाणुनीया
  सारे वरी स्वताला
जरि होय राजबिंडा
  तरि ही नको कुणाला
 हा काळ ओळखा हो ०

जीवीत लोकमत्ता
  हे खेळ ना प्रजेशी
अब्रू पुरे न ती ही
  वृत्ती किती अधाशी !
भोगांत खंड पडला
  जीवन् अडे विलासी
मळ हातचा तुम्हांला
  द्यावे अनंत फांशीं
  हा काळ ओळखा हो ०

जहागीर, इनाम, मनसब्
　ही आयुधेंच तुमचीं
करिती पिळून लोकां
　सेवाच मालकाची
ही गोड गुळ्गुळीत
　पाळीव तुम्ची कुत्रीं
येतां प्रसग मात्र
　होतील पूर्ण भित्री
　　हा काळ ओळखा हो

श्रीराम्, अशोक, हर्ष
　हे कोण, काय, कुठले ?
कां हे सगे न तुमचे
　आतां आम्हांस पटलें
विसरोनि पूर्वजांचा
　इतिहास भारताचा
अन् आजच्या जगाचा
　तग लागणार तुमचा ?
　　हा काळ ओळखा हो

नाही कुणीच राजा
　असलेंच कोणि 'चित्र'
ही भावना स्फुरावी
　माना जनांस मित्र
हा काल मानवाचा
　मानव्य हे सुखाचें
साऱ्या जगा विचारा
　हें चिन्ह ईश्वराचें
　हा काळ ओळखा हो

# तरुणा !–

लेखनकाल—गणेशचतुर्थी १९४६.

[ भारत स्वतंत्र झाला. आतां काय ? सारी शक्ती देशाच्या सर्वांगीण उन्नतीकडे खर्च करणें हेंच आजच्या तरुणांचे– भारतीय युवकयुवतींचें ध्येय. पुनरपि 'सुवर्णभूमी' म्हणून जगांत आपला देश झळकावा या तेजस्वी अपेक्षेनें तरुणांनीं सर्व सामर्थ्यानिशीं आतांपासून कार्याला लागलें पाहिजे. ]

— उगि बाळा —

रणधीरा ! तरुणा ! युवका रे !
देशाचा तूं वीर रे !
आज तुझा जय झाला
पंडित नेहरू नायक बनला
हिंदभूमिचा राजा ।
पाळाया नेत्याची आज्ञा
ऊठ ! आतां कर थोर प्रतिज्ञा
शोभवी भारता, राजसा
जगिं वाढवी योग्यता
भिऊं नको आतां ॥



# हैद्राबादचा पोवाडा.

लेखनकाल: ऑगस्ट व आक्टोबर १९४८.

[लोकसंख्या, क्षेत्रफळ, व उत्पन्न या बाबतीत सर्वांत मोठें संस्थान म्हणजे हैद्राबाद. निजाम हा येथील नबाब. पांच सहाशें संस्थानिकांत निज़ाम हे इंग्रजांचे लाडके बाळ, म्हणजे पर्यायानें हिंदी लोकांचा सर्वांत मोठा शत्रू. पगडी फिरवणें ही या घराण्याची ऐतिहासिक संवय. कां, कोण जाणें ? या परंपरेच्या विरूद्ध वागण्याची दुर्बुद्धी याला झाली नी या वृत-भंगाचें प्रायश्चित्त लगेच म्हणजे १६ सप्टेंबर १९४८ ला त्याला भोगावें लागलें हें झालें त्याचें सामुद्रिक.

इंग्रजांच्या सल्ल्यानें स्वतंत्र भारतांत देखील आपलें आसन स्थिर ठेवण्याचे त्यानें अनेकपरीनीं प्रयत्न केले. त्याचेंच दृश्यफल म्हणचे सतत १४ महिनें संस्थानांत चाललेली झोटिंगशाही.

[ जनता या साऱ्या अनर्थाचें खापर रझवी–रझाकार व लायकअल्ली-मंत्रिमंडळ वगैरेवर फोडीत असेल. कुणी कांहीं म्हणों, मी मात्र निजामालाच या साऱ्या दुर्घटनांचा सूत्रधार समजतो. व याला कारणेंही तशीच आहेत. गादीवर आल्यापासून उमूरमजहबी ( धार्मिक खातें ), उस्मानिया विद्यापीठ ही त्याच्या भावी ( आजच्या ) महत्त्वाकांक्षेचीं प्रचिन्हेंच होत व त्यांतूनच इंग्रज गेल्यामुळें त्याच्या विनाशाची बीजें निर्माण झाली. पाकिस्तान स्थापनेमुळें त्यांत भर पडून प्रत्यक्ष अत्याचाराकडे त्याची प्रवृत्ती वळली व अखेर जे व्हायचें तेंच झालें. ]

वंदन आधीं महात्म्याला, नेता लाभला, भाग्यनगराला,
निजामी सत्ता धुडकिण्याला, भडकवुनि दिल्या लोकज्वाला,
रामानंदतीर्थ धन्य झाला, जी जी

मग वंदुया . हुतात्म्यांना, धीरवीरांना, वीरपुरुषांना,
ज्यांची आहुती होय बलिदान, खरे ते भारतीय संतान,
सारा नवहिंद करी सन्मान, जी जी

आता नमूं त्यागी वीरांना, कष्टले नाना, किती यातना,
भोगिती लढा चालतानां, मुकलं कुणि घर आणि दारांना,
कुणी नागविलं सर्वस्वांनां, जी जी

शाबास किसान वीरांनों ! धन्य तरुणानों ! राष्ट्रघटकानों !
उजळिली तुम्ही स्टेट काँग्रेस, खचविलें धैर्य शत्रुचें खास,
करी हनुमंत मुजरा सेवेस, जी जी

उस्मान राजा जेव्हां झाला, धर्मवेडाला, ऊत हो आला,
अल्पसंख्यांक जागा केला, म्हणें ' इस्लाम राज्य बोला '
आधुनिक औरंगजेब झाला जी जी

स्वातंत्र्यवेड निजामाचं, फारा दिवसाचं, नाहीं आजचं,
हैद्राबाद स्वतंत्र ठिवण्याला, लाथाडुनि दिलं दिल्लिशहाला,
साऱ्या भारताचा शत्रु झाला, जी जी

इतिहास सांगतो निजामशहाचा पहिला
फसविलं आजवर यानं मुसलमानांला
कधि स्वतंत्र नव्हता, स्वतंत्र नाहीं झाला
दडपून म्हणे, ' मज स्वतंत्र राजा बोला '
भाळला सारा इस्लाम वेडा जाहला
संख्येनं थोडा आसुन, याच्या नादानं,
बोले ' इस्लाम, बादशहा झाला, ' जी जी

सुभेदार म्हणुनि हा आला मोंगलांचा ताबेदार
चौथाई देई हा तेव्हां पेशव्यांचा ताबेदार
आजवरी मांडालिक होता ब्रिटिशांचा ताबेदार

वेळावेळीं पगडी फिरवून, हात जोडून, नाक घासून,
कधीं खड्र्यास मार खाऊा, गोऱ्यांचा कायम दास झाला,
कधीं हा खुद्मुख्त्यार बनला ? जी जी ॥ १ ॥

सात हजार मैलांवरून, गोरा येऊन, हिंद व्यापून,
सारा भारत गुलाम केला, धडधडा हिंद सारा रडला,
याला प्रेमाचा पान्हा फुटला, जी जी

ते लोकयुद्ध भारताचं, सत्तावन्न सालचं, निशाण बंडाचं,
हातीं घेऊन देश उठला, सारा भारत एकवटला,
कांपे थरथरा टोपीवाला, जी जी

ते पूर्वज आमुचे धन्य ! भारतीय सैन्य, हिंदु इस्लाम,
तिथें धर्माला दूर सारून, फक्त स्वातंत्र्य पुढें ठेवून,
निघाले शस्त्र सारे परजून, जी जी

तशा आणिबाणिच्या वेळां, स्वार्थि निजामाला, देशद्रोह्याला,
आपल्या सत्तेचा लोभ सुटला, मेला जरि देश काय त्याला ?
मारली मिठी इंग्रजाला, जी जी

त्या सत्तावन सालांत, पहिल्या युद्धांत, दुसऱ्या युद्धांत,
उघडिली खजीन्याची दारं, पुरविलं सैन्य आपलं सारं,
इवं तर वाटेल ते देणार, जी जी

असे थोर दोस्त (?) भेटले, बंड मोडलें, राज्य सुरू झालें,
व्हाइसरॉय ब्रिटिश सम्राटाचे, जांवई सारे निजामाचे,
शक्तिचे मक्तेदार याचे, जी जी

हर्षला मनामधिं तेव्हां हा मुसल्मान सरदार
भारतांत आतां मजला बोटानं कोण शिवणार,
ब्रिटिशांची दैवी शक्ती त्यांच्यावर मी झुलणार

असा मायबाप हो गोरा, निजामचा सारा, जिवाचा प्यारा,
लाडका बाळ इंग्रजांचा म्हणुन ‘ हैदोस ’ इथें त्याचा,
बूट पुसणार इंग्रजांचा, जी जी ॥२॥

हळुहळू बदले धोरण, शहा उस्मान, मोठ्या शिताफीनं,
प्रजेचा विश्वासघात करून, जातिवादाशीं सोयर जोडून,
प्रजेमधिं स्पष्ट फूट पाडून जी जी

अधिकारी आणि पट्टेवाला, एकजात आला, पर्वा नाहि त्याला,
त्याला काय ठाऊक प्रजेचा मान, पाहतो आधीं आपला,
सन्मान, अशानं प्रजा झाली हैराण, जी जी

दडपिण्या प्रजेचं शौर्य, मानसिक धैर्य, संघटनकार्य,
सत्तेचा जुलूम सुरूं झाला, करी कुणीं मान वर त्याला,
बुडासह घालि पाताळाला, जी जी

बहुसंख्य प्रजा खेड्यांत, शेतकरि जात, शिकलेला त्यांत–,
नाहि कुणि एकहि सांपडणार, तिथं सत्तेचें ' दीन ' गाजणार,
लुटारू सारे येत जाणार, जी जी

तिथं कसला राज्यकारभार, नाहि सरकार, चोरबाजार,
चढाओढ पैसे खाण्याला, सावाला फांशी देण्याला,
प्रजेची खच्ची करण्याला, जी जी

ती नवीन भाषा त्यांची बोलावी, हाच दंडक
संस्कृती प्रजेची कुठली ! धर्मवेड भरलें एक
जिथं तिथं दाढी आणि फुन्ना भांबावुनि गेले लोक

तिथं कसली दाद फिर्याद लागते सांगा
झोंटिंगशाहीचा जिथं नाच हा नंगा
जिथं नाहि पोरीबाळींच्या अब्रुला जागा
भरदिवसा कुणिहि लुटावं कुण्या महाभागा
हा कलंक माणुसकीला आजच्या जगा
हें पाप पाव शतकाचं, कारकीर्दीचं
शहा निजामाचं, आमुच्या भोगा जी जी

कायदे मात्र नवेनवें, नुसते देखावे, जगा फसवावें,
हिंदु आणि मुसल्मान दोन, सारखे डोळे माझे प्राण,
प्रजेमागं लागला सैतान, जी जी ॥३॥

निजामाचा काळ उलटला, पंध्रा ऑगस्टला, राशि शनि
आला, हिंद हा स्वतंत्र हो झाला, गोरा मालक निघुन गेला,
संस्थानिक सारा पोरका झाला, जी जी

संस्थानिक सारे जमून, काळ ओळखून, वेळ पाहून,
उतरलं आपल्या मुकुटाला, सरदारांच्या पायाशीं ठिवला,
मुजरा केला तिरंगि झेंड्याला, जी जी

हट्टानं बाजुला झाला, निजाम एकला, मग्रुरिला आला,
एकल्याची काय माय व्याली, जीना–चर्चिल जोडगोळी,
म्हणुन टूरपूर सुरूं झाली, जी जी

गोळा केले गुरूचे चेले, राहु केतु भले, इंग्लंडहून आले,
निजामाची पाठ थोपटायुला, खजीना रिकामा करण्याला,
सल्लागारांचां सल्ला ठरला, जी जी

मालकांच्या सेवेकरितां, जोडे उचलतां, सलामी करितां–
ज्याच्या घराण्याचा जन्म झाला, आज तो गेला
मालक पहिला, म्हणून का स्वतंत्र हा झाला ? जी जी

विधवेला लहर कुंकाची, तशी हो याची, स्वतंत्र होण्याची,
धर्माचं नांव पुढं लावून, वरच्या बापाला हांका मारून,
दिली स्वातंत्र्यग्वाहि ठोकून, जी जी

आतां माझ्या संस्थानांत, एक मी मस्त, प्रजा निशस्त्र,
गुलामी प्रजा काय करणार, मला तो एक शत्रू ठरणार,
रामानंदतीर्थ मात्र लढणार, जी जी

या स्वातंत्र्यास विरोधी, स्टेट काँग्रेस आहे एक
डांबले तुरूंगीं सारे, काँग्रेस्चे सारे सैनीक
भासला काळ स्वामीजी, दरदरले सत्तेचे लोक

सात ऑगस्ट सत्तेचाळीस साला, पूज्य स्वामिला,
आपल्या नेत्याला, आपल्यापासून दूर नेला, निजामी
नरकवास घडला, देशभक्तास बंदिशाला, जी जी ॥४॥

आपलं राज्य टिकण्याला, मंत्र हो दिला, धर्मवेड्याला,
हांक मारुन गोळा केला, ' आझादिचा शत्रु कुणी असला,
फस्त करा त्याच्या सर्वस्वाला ' , जी जी

' करु नका पर्वा कोणाची, धनिक लोकांची, गरीब जीवांची,
राजनिष्ठेची दाखवा रीत, तुम्हाला शत्रु कोण माहीत '
दिली माकडांच्या हातीं कोलीत, जी जी

प्रत्यक्ष राजाज्ञा झाली, जमलि मंडळी, गुंड मवाली,
आतां त्यांना पर्वकाळ आला, प्रत्येकाचा बाहू फुरफुरला,
निघाला कीर्ति गाजवायला, जी जी

तो रझवि पुढारी त्यांचा, धर्मवेड्यांचा, साऱ्या लुटारूंचा,
' धर्माकरितां जर तुम्हि मेलांत, मिळवा अप्सरा तिथं स्वर्गात '
याला ' जेहाद ' असें म्हणतात, जी जी

घेतलं नांव रझाकार, पाठी सरकार, पोलीस लष्कर,
प्रजेमधिं मित्र कोण दिसणार ? भेदाभेद तिथं कसा करणार ?
सारखा सप्पा करित जाणार, जी जी

शेंकडो गांव जाळले, लोक मारले, हाल हो केले, लहानगी बाळें
फेकलीं अग्नींत, सतींची अब्रु गेलि मातींत,
चंहुकडे हाहा:कार उडवीत, जी जी

रझाकार आणी पठाण, मोकळे सोडून, केलि प्रजा दीन,
राक्षसी प्रकार चालविला, तिथं ना सत्ता नांवाला,
लक्ष्मी चाल्लि विनाशाला, जी जी

आठवलि अवदसा आज कोठून ही निजामाला
अवदसाच त्या रुपानें कासीम रझावि अवतरला
सातवी पिढी ही त्याची होणार नाश हा ठरला

असे निर्दय अत्याचार, करून प्रजेवर, अनाथांवर
आझादी आपली टिकवीणार, सारि बेबंदशाहि माजवणार,
त्याचा मग 'जुनागड' होणार, जी जी ॥५॥

'योजना हीच नाशाची, राज्य जाण्याची, सर्व बुडण्याची,
धर्माचं राज्य नाहि टिकणार, निजामा ! लौकर हो हुश्शार,
नाहितर जिवंत तूं मरणार, जी जी

अजूनिहि वेळ ना गेली सावधान् तुला होण्याला
ते रझाकार अन् रझवी करतील तुझ्या नाशाला
पाकिस्तान बहोत है दूर कां लागतोस नादाला ?
त्या खेटरखाऊ चर्चिलच्या- खाजवूं नको चिरूटाला
पदरांत काय पडणार गोजारून त्या यू. नो. ला ?

ही सारी पैशाची भुतं, खायला शितं, म्हणूनी जमत,
पोळितिल मध निघुन गेला, कुणी ना येतिल कामाला,
अखेर तुझी कबर भारताला, जी जी

'अरे अरे निजामा ! स्वतंत्र भारत थोर
त्यांतला एक तूं ठिप्का, नको बनुं स्वैर
पाण्यांत राहुनी कराशि माशाशीं वैर

बदलून टाक तो ओघ तुझा मागील
मार ठोकर त्या नांवाला ' यारे वफादार '
हो स्वतंत्र या राष्ट्राचा घटक तूं शूर
हो दुसरां शेख अब्दुल्ला ' शेरे काश्मीर '
अल्लाच मान हा देश किंवा सरदार
सद्‌बुद्धि आली जर तुला, जीव वांचला,
गाजशिल भला, धन्य तूं वीर, जी जी

कुठं लाल किल्ला अन् अरबी सागर दोन्हीं
प्रबलांच्या या वाटेला जावें कां कोणी ?
चालला रझवि हा तसा ऐट हो मानी
कुठं ऐरावत अन् कुठं भट-तट्टाणी
दुश्चिन्ह म्हणुन जाणावें मुसलमानांनी
आणा आपल्या पंडितजींची घोषणा ध्यानीं
' हा भारत धर्मातीत असे या भुवनीं
तेहतीस कोटिमधिं विलीन व्हावें त्यांनीं
मग नवें राष्ट्र अन् नवी संस्कृती यांनी
होतील थक्क नवखंड तेज पाहोनी
ना दुःख असे ना त्रास, पूर्ण सौख्यास,
नेऊं या देश, झटुनि सर्वांनीं, जी जी

बंधुनों ! सारा आजार, एक डॉक्टर, बरा करणार,
आपुलें हिंदुस्थान सरकार, चिरायु होवो शूर सरदार
लोक-सम्राट जवाहरलाल, जी जी ॥६॥

बघा निजाम् काय बोलला, हिंद नेत्याला, पटेल मेनन्‌ला
"राजे सारे तुमच्यासारखे वागणार, माझ्या इथं ' ते ' नाहीं
चाल्‌णार, पोझिशन् इथं वेगळी रहाणार, जी जी

अधिकारी आणि सरदार, मुसलमान थोर, भिति त्यांना फार, आज जर सामिलनामा केला, हिंदु राज्याचा वास आला फाळणीनं झाला घोंटाळा, जी जी

मग जातिवाद माजेल, प्रजा बेताल, होईल कल्लोळ, काय होईल कसं कळणार, मुसलमान समाज घाबरणार, दक्षिणेंत रक्तपात घडणार, जी जी

म्हणून त्यांची खात्री करण्याला, काढा फौजेला, न्यावं दिल्लीला, भीतिचा दूर होईल परिणाम, एक होतील हिंदु इस्लाम, शांतता नांदेल दोन्हीं धाम, जी जी

एक वर्ष पहिला कारभार, जसा आजवर, चाल्ला मजेदार चालुं द्या, पहा काय होणार, बेकिचा लेश नाहीं उरणार, साऱ्यांच्या मनांसारखं होणार, जी जी

निजामाचे ऐकुनि बोल थांबलें हिंद सरकार
हा कसा वागतो पाहूं पुढं याची काय दरकार
जर प्रामाणिक हा ठरला दक्षीण शांत रहाणार

झाला करार एक वर्षाचा, हैद्राबादेचा, शहा निजामाचा, लोकांनीं विरोध जरि केला, राष्ट्रहित केवळ जपण्याला, ' जैसे थे' करार मान्य केला, जी जी ॥७॥

राष्ट्राचे पिता महात्माजी, अमर गांधीजी, गेले जरी आजी, तत्वानं आजरामर झाले, राष्ट्राच्या रोमरोमिं भिनले, जवाहर तेंच रुप उरलें, जी जी

अभ्यास केला संपूर्ण, धर्म आणि वर्ण, राष्ट्राचें मरण, देश-सर्वस्व मारण्याला, आपापुला स्वार्थ साधण्याला, जाति-वादास जन्म दिधला, जी जी

ज्यामुळें राष्ट्र गुलामींत, हजारों वर्षांत, पिचलें नरकांत,
जातिवादास असो धिःकार, त्याला आतां मूठमाति मिळणार
हैद्राबादेंत शेवट होणार, जी जी

मनामधें हेतु हा थोर, धरुनि सुविचार, हिंद सरकार,
काढुनी घेतलं फौजेला, सारा जरि लोक तुटुन पडला,
बांधलं गेलं करार पाळण्याला, जी जी

या भलेपणाचा अर्थ काय पहा झाला
मूर्खाच्या बाजारांत शाहणा सांपडला
कोल्ह्यानं बनाविलं जातिवंत सिंहाला
असं उघड होऊं लागलं दिवसा दिवसाला
जातांच फौज निजामाला जोर फार आला
नुक्त्याच झाल्या कराराला साफ विसरला
जसा सार्वभौम सम्राट, वागूं लागला
नळकांड्यांत घातलं, तरी जातिवर गेला,
बेवारशी कुत्र्याचे हाल, कोण खाईल, काय
होईल, कळलं नाहि त्याला, जी जी

वीस कोटि रुपये सुर्ती आधिं दिले पाकिस्तानाला
गोव्याशीं बांधलं संधान त्या समुद्रास भिडण्याला
भारताचा सुर्ती रुपाया संस्थानांत बंद हो केला
सोडून धनी हा घरचा परक्याचा हात हो धरिला

मैत्रिची वाट सोडून शत्रु जाहला जी
चोरुन दारुगोळा सारा येऊं लागला जी
कोट्यांशि जिन्गानीचा नाश होऊं लागला जी
'जैसे थे' कराराचं फळ आलं उदयाला जी

बंधुनों ! पुढचा इतिहास, गमतिचा खास, ठेवा विश्वास,
निजाम् कसा मगरमस्त झाला, पाजली दारु माकडाला,
बघा पुढं कसा रंग चढला, जी जी ॥८॥

वाढवून आपलं बस्तान, रझवि सैतान, जनिावर ताण,
म्हणे ' भारत करतो इस्लाम, हिंदचे लोक सारे नादान,
द:खनचें करणार पाकिस्तान ' जी जी

' जैसे थे ' करार ऐकून, झाला बेचैन, करी फणफण, जम-
विलं त्यानं आप्लं सरकार, रझाकार बंड माजविलं फार,
' शबहे उस्मान ' करी ललकार, जी जी

' फेका करार उकिरड्यावर, हिंद हा जर, करील हात वर,
वरच्यावर दोन्ही हात छाट्णार, पाकिस्तान नाहीं उगीच
बसणार, मुसलमान सारा एक होणार ' जी जी

' हा पटेल कोठला कोण, गुजर ब्राह्मण, जमले सारे जण,
तेलि तांबोळी राजे व्हावें, यांनी का राज्य चालवावें,
गादिवर आम्हीच नांदावें' जी जी

भडिमार शिव्यांचा केला, हिंद नेत्याला, हिंदि जनतेला,
राहिला ताळतंत्र कसला, जिभेचा बंध सारा सुटला, हिंद
आश्चर्यचकित झाला, जी जी

म्हणे ' पांच लाख रझाकार, तीस हजार, फौज तैय्यार,
चहुंकडे घेरा आमूचा पडणार, अरबी सागर पाय धूणार,
हिंदचा चक्काचूर करणार ' जी जी

जणुं स्वर्ग हाताशीं आला, भडकला कालचा पोर
' सोलापूर, बार्शी आतां चुटकींत यंव घेणार
श्रीमंत शहर बॉंबेला घटकेंत धूळ चारणार
मग लाल दिल्लिचा किल्ला तिथें झेंडा आमूचा चढणार,

इतक्यांत झाला आवाज, पडलं नानज, जिरालि त्याची खाज,
' या अल्ला आतां क्या करना, तिथं जाऊन फुकट क्यौं
मरना, घरच्या म्हातारीचें काळ होना ' जी जी ॥९॥

माजविला आंत गोंधळ, एकवटून बळ, होतं पाठबळ,
प्रजेला उरला नाहि वाली, भारतिय प्रजा दीन झाली,
वाहे स्वातंत्र्या लाखोली, जी जी

धडधडा अग्नि पेटला, संस्थानांतला, दिसला साऱ्यांला
आपल्या जनतेची दशा पाहून, लोकराज्याला दुबळं समजून,
भारतिय प्रजा गेलि बिथरून, जी जी

' निजामाचं दुटप्पी धोरण, इकडं असं बोलणं, तिकडे तसं
वागणं, पाहुनी थंड काय बसला, पळविला इंग्रज इंग्लं-
ड्ला, गेला कुठं शूरपणा आपुला, जी जी

तितक्याच थंड डोक्यानं, हिंदराज्यानं, विचार करून,
१७ जून करार पुढं ठिवला, निजामानं उत्तर दिलं त्याला,
शोईबउल्लाखान ठार केला, जी जी

हादरलं हिंद सरकार, घडलं असं जर, दक्षिणोत्तर,
देश सगळाच बळी पडणार, राष्ट्रवादास धक्का बसणार,
पुन्हां भारत गुलाम होणार, जी जी

राजाजी मुत्सद्दी थोर, मोठे गव्हर्नर, पाठाविलि तार,
" निजामा फौज ठेव हिंद, रझाकार जुलूम कर बंद,
चहूंकडे होईल आनंद " जी जी

ज्याचा खड्डा मरणाचा खणला, सुबुद्धी त्याला, सुचेल कशी बोला,
अंधारांत बसून खल केला, एका रात्रीचा बेत ठरला,
प्रजेची कत्तल करण्याला, जी जी

दक्ष जे हिंद सरकार, ठरविलं पोलीस अॅक्शन
नेहरूनीं सही करतांना भिजविला हुकूम अश्रूनं
पोलादि वीर देशाचा सरदार बोले गहिंवरुन
हे पठार महाराष्ट्राचे गहिंवरले शब्द ऐकून

सोलापूर मैदानावर वेळ पहाटेची जी
चौधरी उभा पाहात वाट हुकुमाची जी
पाठीशीं खडी हो भिंत शूर सैन्याची जी

'वीर हो,' बोले सरदार, 'महात्मा वर, देई आशीर,
राष्ट्रधर्माला जागें राहून, नकाशे पहिले टाका फाडून,
करा भारत एक स्थापन, जी जी ॥१०॥

दिन १३ सप्टेंबर, दिवस हा थोर, साऱ्या देशभर,
लहान थोरांत आनंद भरला, लहान मुलासारखं नाचूं लागला
घटकाभर नाही भान त्याला, जी जी

उगवला दिवस सोन्याचा, आपल्या देशाचा, भरत खंडाचा,
आंत लोकांनी सोडिला श्वास, बाहेरच्यास लागलि
घराची आस, धांवपळ झाली अशी सर्वास, जी जी

पटेलांची आज्ञा घेऊन, सोलापूरहून, निघालं सैन्य,
दुर्गाचा भरभक्कम किल्ला, एका धडक्यांत खालीं पडला,
चौधरी मिळवि मान पहिला, जी जी

एकिकडे चौधरी वीर, सेनापति रुद्र, बहादुर ब्रार,
तसे शिवदत्तसिंग आपुले, इंग्रजामुळं झांकले गेले,
आज देशाचं 'भाग्य' ठरले, जी जी

तुळजाई माता वंदून, निघालं सैन्य, वायुवेगानं,
हुमणाबाद आणि जहीराबाद, तिथूनच बिदर महमुदाबाद
रझाकार केंद्र केलि बरबाद, जी जी

तिकडं औरंगाबाद शहर, फार महशूर, निजामाला प्यार,
सुभेदार तिथ्ला शरण आला, नाहि रक्ताचा थेंब पडला,
रझाकार मात्र कुठं दडला? जी जी

जालना तशीच इंगोली, कुणीकडं पड्ली, कशी ही लढ्ली,
कळालं फार थोडक्याला, मुसलमान आतां घाबरला,
कळेना प्रकार काय घडला, जी जी

तिकडं पडलं सूर्यापेठ शहर, चहुंकडे कहर, हिंदचा जोर,
आतां मात्र निजाम बाव्चळला, माकडानों कुठं आहांत बोला,
लाखो रझाकार कुठं मेला, जी जी

चौधरीनं केली लट्पट गाठ्लं त्यानं नटि, सदाशिव पेठ,
ठेपला चाळीस मैलावर, दिसूं लागली तिथून शहर,
सिकंद्राबाद भागानगर, जी जी

राजेंद्रसिंह द:खनचा सरसेनापति यशवंत
बोलला निजामाला तो ‘ ये शरण एका शब्दात
हिंदवीर माझे आंता घुसतील हैद्राबादेंत
आतांतरि हो माणूस या शेवटच्या घटकेंत ’

जीनानं अखेरीला दिला दगा जोरांत जी
मॉंक्टन, सिडने ते कुठं दडले मसणांत जी
चार्चिल साहेब कुठं बसला चिरुट फुंकीत जी
भोंवतालची सारी माकडं बस्ली खाजवीत जी

असहाय निजाम जाहला, डाव खेळला, परंतू हुकला,
शरीराचा बंद सारा सुटला, साडेचार दिवस कसा जगला,
सत्तेचा खेळच आटोपला; जी जी ॥११॥

आला शरण घातल लोटांगण, बसला आपण, पगडी फिरवून
सार्वभौम म्हणून याला मानलं, त्या लोकानां यानं पाळ्थं
पाड्ल, आपल्या वडिलांचं नांव राखलं. जी जी

इतिहास इथें संपला, निजाम् जसा पडला, जातिवाद मेला,
चौधरी करील त्याची आरती, देशाची वाढेल मग शक्ती,
अमर गांधींची ध्येयपूर्ती, जी जी

मुत्सद्दी हिंद सरकार, नेहरू, सरदार, जसे आजवर,
अजरामर झालें नांव त्यांचें, उलटलें पान इतिहासाचं,
प्रणेते स्वतंत्र या भूचे, जी जी

बदलला रंग तांबडा आणि हा पिवळा
भारतीं शोभला तिरंगि ध्वज एकला
कैकांचं रक्त अन् शिरें वाहिलीं ज्याला
तो अशोकचक्रांकीत झेंडा आपुला
उजडेल एक तो दिवस वंद्य जगताला
मानव सारे आधार शोधितिल याला
सर्वस्व आपुलें लावूं , जपूं या याला
महाराष्ट्र असो सौराष्ट्र, हिंद हें राष्ट्र,
हवें आम्हांला, जी जी

सातशें वर्षानंतर, भागानगर, झालं स्वतंत्र, आमचा
ठरला मुक्ततादिन, घेतलं आईचं दर्शन,
हिंदस्वांतत्र्य झालें संपूर्ण, जी जी ॥१२॥



# – नागरिक –

लेखनकालः– १६ एप्रिल १९४९.

[ अनुयायांच्या अविचारी वागणुकीनें शुक्राचार्यांची संजीवनी गेली. भस्मासुरानें शंकराकडून मिळालेल्या देणगीचा उपयोग स्वतःच्या नाशांतच करून घेतला. आणि आज संयुक्त राष्ट्र संघटनेंत बसून मानवाच्या मूलभूत हक्काचा मोठ्या हिरीरीनें–दिमाखानें–पुरस्कार करणारी बडी राष्ट्रें, हातीं आलेल्या अणुशक्तिचा उपयोग जगाचें नंदनवन बनविण्याकडे होणें शक्य असतां प्रचंड मानवी संहाराकडे व एकमेकांना दम देण्याकडे करीत आहेत. याचा परिणाम कशांत होईल हें निराळें सांगण्याची अवश्यकता नाहीं. शुक्राचार्य व भस्मासूर यांचा इतिहास समोर आहेच.

आज भारतांत काय चाललें आहे ? स्वातंत्र्य म्हणजे स्वैराचार हाच अर्थ आमचे देशबंधू करीत आहेत ना ! स्वातंत्र्य म्हणजे आपली व्यसनें, दुर्गुण, स्वार्थ यांना भरपूर वाव असेंच का समजावयाचें ? आज देशाला कशाची जरूरी आहे ? देश भक्कम–बलवान् करावयाचा असेल तर आपली जबाबदारी काय ? हें ओळखलें तरच मिळालेलें स्वातंत्र्य आपण कायम टिकवूं शकूं. ]

त्यागानें अन् कष्टानें अन् सत्य अहिंसेनें
गुलामिची शृंखला तोडिली आपुल्या कॉंग्रेस्नें.
स्वतंत्र झाला देश आपुला, आपुला तो झाला
कळकळ सारी जबाबदारी आतां आपणांला.
पडका, झडका देश दरिद्री पूर्ण हातीं आला
सुधारण्याला याला परका कोण येई ओला ?
सुंदर भारत, भक्कम भारत, भारत हा बलवान्
माणुसकीचें नंदनवन बनवुंया देश श्रीमान्.
मानवतेचें चिन्ह तिरंगी फडके डौलानं
उद्या करावें आखिल मानवी दुनियेनें नमन.

परंतु सारें हें घडण्याला आणि टिकविण्याला
 काय करावें लागेल आधीं आपणांला बोला ?
स्वतंत्र झाला देश परंतू आपण परतंत्र
 दुर्व्यसनानें दुबळे झालों, पुढें हेंच सत्र.
कुणी दारुचे, कुणी शिंदिचे, कोणी गांजाचे
 गुलाम सारे, कोणी बनले आपुल्या स्वार्थाचे.
निशेत हे लोळणार सारा वेळ झिंगणार
 कोण कुणाचें ? बंधु बंधुचे लचके घेणार.
झालो दुबळे, पूर्ण नेभळे, गुलाम व्यसनाचे
 नालायक म्हणविण्यास ‘ मालक स्वतंत्र देशाचे ’
पहा बंधूनों ! विचार करुनी आधीं हें ठरवा
 देशाच्या या उन्नतीस हा मार्ग काय बरवा ?
आज जाहलां स्वतंत्र देशाचे या नागरिक
 जबाबदारी आधीं ओळखा, व्हा हो लायक.
नकोत व्यसनें, नकोत दुर्गुण, नकोच तो स्वार्थ
 गुलामगिरिची चिन्हें सारी, मारा हो लाथ.
तुमची शक्ती, तुमची बुद्धी, तुमचे सद्‌गूण
 या राष्ट्राच्या गरजेला हो कराच अर्पण.
धीर, वीरअन् शूर, धाडसी तसाच नायक
 असा पाहिजे देशाला हो शिपाई प्रत्येक.
जगांत आपुल्या देशाचा सत्कीर्ति-गंध पसरा
 देश आणि ध्वज व्हावीं मानवतेच्या जलधारा